# सामुद्रिक शास्त्र.

यांत

प्रऱ्हादप्रणीत हस्तसामुद्रिक, अंगसामुद्रिक, पुरुषसामुद्रिक, स्त्रीसामुद्रिक, हरगौरीप्रणीत सामुद्रिक, वराहमिहिरकृत सामुद्रिक, गर्गमुनिकृत सामुद्रिक, इत्यादिकांचा संग्रह केला आहे.

हें पुस्तक

**प्रभाकर बाळाजी ओगले**

यांनीं केलें तें

**धोंडो आबाजी देवळ**

यांनीं

“ जगद्धितेच्छु ” छापखान्यांत छापविलें.



सन १८९०.

# प्रस्तावना.

ह्या हिंदुस्थानांत छापण्याची कला सुरू झाल्या- पासून अनेक जुन्या ग्रंथांचा जीर्णोद्धार होऊं लागला आहे, ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय. प्रस्तुत ग्रंथ अद्यापि कोणी छापिल्याचें दिसत नाहीं. कांहीं व- र्षांमागें एक लहानशी छापील प्रत माझे पहाण्यांत आली होती, परंतु तींत अगदीं थोडी माहिती होती. यामुळें चांगल्या भरपूर माहितीचें पुस्तक मिळवून छापिल्यास चांगला उपयोग होईल, असें मनांत येऊन निरनिराळ्या चार प्रती मिळवून, वे. शा. सं. रा. रा. दामोदर शास्त्री पुराणिक यांजकडून तपासवून, शुद्ध व सरळ मराठी अर्थासह हें पुस्तक तयार करवून सामुद्रिकाचा अभ्यास करणारांस अर्पण केलें आहे.

कित्येकांचा सामुद्रिकशास्त्रावर भरंवसा नसतो या- चें कारण अर्धवट अभ्यास केलेल्या भिक्षुक लोकांनीं कांहीं तरी बरें वाईट सांगून लोकांस फसविलें असतें, हें होय. त्यांनीं या ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें लक्षणें, इतर भाग्यवान् किंवा दरिद्री यांच्या लक्षणांशीं मि- ळतात किंवा नाहीं, हें नीट बारकाईनें मेळ घेऊन पहावें; मग या शास्त्रास दोष द्यावा, इतकीच विनं- ति आहे.

या पुस्तकांत प्रल्हादप्रणीत–हस्तसामुद्रिक, १ अंग- सामुद्रिक, पुरुषसामुद्रिक, स्त्रीसामुद्रिक. २ वराहमि- हिरकृत–सामुद्रिक. ३ हरगौरीप्रणीत–सामुद्रिक. ४

गेमुनिकृत—सामुद्रिक. इत्यादिकांचा समावेश के-
आहे.

आणखी कोणी अधिक माहिती दिल्यास त्यांचे
आभार मानून तिसऱ्या आवृत्तीचे वेळीं सदर पुस्तकांत
सामील करीन.

प्र० बा० ओगले.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

प्रथमावृत्ति प्रसिद्ध केल्यावर त्यांतील प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें बऱ्याच लोकांकडून निरनिराळ्या प्रकारच्या सूचना आल्या त्यांपैकीं ज्या ग्राह्य होत्या त्यांचा स्वीकार करून त्याप्रमाणें या आवृत्तींत फेरफार केला आहे. तसेंच कित्येकांकडून कांहीं टिपणें-ही आलीं त्यांपैकीं योग्य तीं या आवृत्तींत सामील केलीं आहेत. प्रथमावृत्तीचीं सर्व पुस्तकें सहा महिन्यांचे आंतच खपल्यामुळें लोकांस या शास्त्राची बरीच आवड आहे असें समजून ही दुसरी आवृत्ति तयार करून हिची मालकी रा. रा. धोंडो आबाजी ...ळ यांस दिली आहे.

प्र० बा० ओ०.

# सामुद्रिकशास्त्र.

## अथ प्रल्हादप्रणीतहस्तसामुद्रिकारंभः

### श्लोक.

अथातः संप्रवक्ष्यामि हस्तसामुद्रिकं शुभं ॥
प्रशस्यते विशेषेण हस्तः पंचागुलस्तथा ॥ १ ॥

अर्थ—शुभ जें हस्तसामुद्रिक तें सांगतों. ज्या हस्ताला पांच अंगुली ( बोटें ) असतात, तो हस्त श्रेष्ठ जाणावा ॥ १ ॥

विशेषाद्दक्षिणः पुंसां वामः स्त्रीणां तथा स्मृतः ॥
रेखा निसर्गजा यत्र काले नैमित्तिकास्तथा॥२॥

अर्थ—विशेषेंकरून पुरुषांचा उजवा हात, व स्त्रियांचा डावा हात पहात जावा. कारण त्या ठिकाणीं स्वाभाविक शुभाशुभसूचक रेखा असतात ॥२॥

मणिबंधे कंकणाख्याश्चतस्रो भोगलक्षणाः ॥
राज्ञां तिस्रस्तु नारीषु कामिन्यां द्वितयं स्मृतं॥३॥

अर्थ—मणगटावर तळहाताच्या खालीं चार रेखा असल्यास राजचिन्ह, तीन रेखा असतील तर पुष्कळ स्त्रिया भोगील; दोन असल्यास एकच विवाह करून साधारण भोगी व प्रपंचिक होईल ॥ ३ ॥

अंगुष्ठ पर्वणी द्वे तु त्रीण्यन्यासामुदीरिते ॥
पर्वांतरे पर्वणि च रेखाः स्युः फलदायकाः ॥४॥

**अर्थ**—अंगठ्यास दोन पेरें व इतर बोटांस तीन पेरें असतात; पेरांत पर्वरेखा व पेरांच्या मध्यभागीं पर्वमध्यरेखा असतात, त्याच फल देणाऱ्या होतात ॥४॥

**अंगुष्ठाग्रं तु तर्जन्या द्वितीयं पर्व संस्पृशेत् ॥**
**शिल्पे च लेखने शस्त्रविद्यायां वा बलाधिका ॥५॥**

**अर्थ**—अंगठ्याचें टोंक तर्जनीच्या दुसऱ्या पेरापर्यंत स्पर्श करीत असेल तर तसला पुरुष शिल्प लेखन, शस्त्रविद्या, यांत आपलें नांव गाजवील ॥५॥

**अनामिका तृतीये च समुत्तुंगा कनिष्ठिका ॥**
**बंधुश्रैष्ठ्यं प्रकुरुते धनाधिक्यं च पौरुषं ॥ ६ ॥**

**अर्थ**—कनिष्ठिकांगुली ( करंगळी ) अनामिकेच्या दुसऱ्या पेरास आक्रमून तिसऱ्या पेरांत जाई इतकी लांब असेल तर सर्व बंधूंमध्यें श्रेष्ठ होईल, धनवान् होईल, आणि पुरुषार्थ मिळवील ॥ ६ ॥

**पर्वांतरालं सूक्ष्मं च पृथुपर्व यदा भवेत् ॥**
**संयोजने छिद्रदर्शी निर्धनो भविता नरः ॥ ७ ॥**

**अर्थ**—बोटांचीं पेरें मोठीं असून पेरांचा मध्यभाग बारीक असेल तर, ह्मणजे बोटें जुळलीं असतां मध्यें खिड पडल्यास तो मनुष्य निर्धन होईल ॥ ७ ॥

**अंगुष्ठस्य तु पर्वांत गोधूमयवरेखिकाः ॥**
**सूचयंत्यपि मिष्टान्नं धनधान्यादिसंपदः ॥ ८ ॥**

**अर्थ**—अंगठ्याच्या पेरांत तांदुळासारखा किंवा गव्हासारखा आकार असतो; बाकीच्या बोटांच्या पेरांतही यवाकार असतो; तो असल्यास मनुष्याला

मिष्टान्नभोजन व धनधान्यसंपत्ती हीं मिळतात ॥ ८ ॥

**शंखचक्रं च कलशमंगुल्यग्रेषु दृश्यते ॥**
**त्रिचक्रमेककलशं शंखमेकं प्रभुर्भवेत् ॥ ९ ॥**

**अर्थ**—बोटांच्या शेवटीं शंख, चक्र, कलश ह्या आकारांच्या रेघा असतात; तीन चक्रें, एक कलश, एक शंख असल्यास तो मनुष्य प्रभुत्व पावेल. ॥९॥

**अंगुष्ठांगुलिपर्वांतश्चतुष्कोणं भवेद्यदि ॥**
**स भूजीवनामप्नोति मंडलेश्वरसंनिभः ॥ १० ॥**

**अर्थ**—अंगठ्याच्या पर्वरेखांमध्यें विषम चतुष्कोणाकार रेखा असल्यास तो नर मांडलीकराजाप्रमाणें होईल किंवा शेतकीचा धंदा करून पोट भरील. ॥ १० ॥

**अन्यासामंगुलीनां तु चतस्रस्तुंगरेखिकाः ॥**
**पर्वांतराले उत्तुंगा भवंति शुभलक्षणा ः॥ ११॥**

**अर्थ**—इतर बोटांच्या पर्वरेखांमध्यें उभ्या चार चार रेखा असल्यास शुभ लक्षण जाणावें ॥ ११ ॥

**भोगाधिक्यं चतसृभिस्तिसृभिः समभोगता ॥**
**द्वाभ्यामत्यल्पभोगः स्यादेकरेखा विरागकृत् १२**
**रेखाभावे महत्कष्टं कलशं मध्यमोत्तमे ॥**
**शुक्तिकं शंखरेखा वा कनिष्ठाग्रेऽधिकं धनं ॥१३॥**
**तिसृष्वन्यासु चक्रं तु दक्षिणावर्तमुत्तमम् ॥**
**प्रभुत्वमधिकारं वा प्राजापत्यं च सूचयेत् ॥ १४**

**अर्थ**—त्या रेखा चार असल्यास अधिक भोग, तीन असल्यास समभोग, दोहोंस अल्पभोग, एक अस

त्यास वैराग्य, रेखा नसल्यास मोठे कष्ट होतील; मधल्या बोटाच्या शेवटास कलशाकार टोंक खालीं झालेल्या रेखा, तसेंच कनिष्ठिकेच्या शेवटास शंख अथवा शुक्ति ( शिंप ) रेखा, इतर तिन्ही बोटांस उजव्या फेरांचीं चक्रें असलीं तर अधिक धन, अथवा प्रभुत्व, प्राजापत्य, अथवा अधिकार प्राप्त होतो. बोटांच्या पर्वमध्यभागीं यवरेखासहीत अग्रांमध्यें चक्रादिरेखा असल्यास वर सांगितलेलें फळ असतें ॥१४॥

**वैकल्ये योग भंगः स्यात्साकल्ये तु महाफलं ॥**
**कासांचिदंगुलीनां चेत्कत्यब्दैः स्याद्विपर्ययः १५**

**अर्थ**—बोटांचीं जीं लक्षणें सांगितलीं तीं सर्वेही असल्यास महाफल प्राप्त होतें, त्यांत भग्नरेखा असल्यास योग असूनही नष्ट होतो. सर्व बोटांत हीं शुभ लक्षणें असल्यास आजन्मपर्यंत सुख प्राप्त होतें. अंगठ्यासह एकास २० वीस वर्षे याप्रमाणें ज्या बोटांत शुभलक्षणें असतील तितकीं वर्षे अधिकारादि शुभ योग उत्पन्न होतात. कितव्या बोटांत योग रेखेस भग्नरेखा असेल तितक्या २० पट वर्षांनंतर कष्ट प्राप्त होतात. सर्वत्र योगरेखेस शकलरेखा आडव्या छेदून फाटे फुटल्यास संभवणारीं सर्व कार्यें मोडून जातात. याप्रमाणें कालफलज्ञान ज्याचें शंभर वर्षे आयुष्य असेल त्यास लागूं करावें. इतरांस त्यांची आयुष्यरेखा पाहून तिचे पांच भाग करून त्याजवरून दरएक भागास हिस्सेरसीनें किती वर्षे येतात याचा निर्णय करून चातुर्यानें सांगावें ॥ १५ ॥

विनांगुष्ठमधः स्याच्चेदंगुलीनामृजुद्वयं ॥
संसारिलक्षणं ब्रूते विपरीते विपर्ययः ॥ १६ ॥

**अर्थ**—अंगुष्ठावांचून इतर चारी बोटांस खालीं दोन दोन रेघा जुळ्या असल्यास दंपत्यासह संसारांत सुख पावतो, नसल्यास कष्ट पावतो. ह्या रेखा सूक्ष्मही असतात ॥ १६ ॥

क्रीडाविद्याभोगपुण्यफल मंत्यादिकीर्तितं ॥
सूक्ष्माभ्यामृजुरेखाभ्यां तद्भंगे भंगसंभवः ॥ १७ ॥

**अर्थ**—कनिष्ठिकेच्या खालीं दोन उभ्या सूक्ष्म रेघा असल्यास बाळपणापासून सुख, अनामिकेच्या खालीं असल्यास विद्यालाभ, मध्यमेच्या खालीं असल्यास धन व स्त्रीसंभोग, तर्जनीच्या खालीं असल्यास पुण्यकार्यसाधन, याप्रमाणें असून त्यास आडरेघा असल्यास फलप्राप्तीचा समय येऊन चुकून जातो. रेखा नसल्यास फलच नाहीं. स्पष्ट न दिसणाऱ्या अशा असल्यास फलही प्रगट नसतें ॥ १७ ॥

अंगुष्ठकरमध्ये तु रेखा ऋज्वायता भवेत् ॥
संपूर्णहस्तपर्याप्ता सा सीमा पौरुषे स्मृता ॥ १८ ॥
अंगुष्ठानामिकामध्ये तेजसांतःप्रसारिणी ॥
वायव्यंतप्रसृमरा स्त्रीसीमा भागरूपिणी ॥ १९ ॥
तयोः संगेहि दांपत्यं वियोगे तु वियोगिता ॥
पुंप्रजा पौरुषाधिक्ये स्त्र्याधिक्ये स्त्रीप्रजा स्मृता२०
यदन्यतरसंप्टक्तिस्तत्रैव व्यभिचारता ॥
विच्छेदे तु पुनः कर्म वक्त्यंतरकृतं भवेत् ॥ २१ ॥

**मालिन्ये रोगबाहुल्यं शैथिल्ये त्वंगभंगता ॥**
**वैवाहिककफलं चैव सीमारेखाद्वयोद्भवम् ॥ २२ ॥**

**अर्थ**--अंगठा आणि हात यांच्या मध्यें अंगठ्याच्या मुळापासून अंगठा आणि तर्जनी यांच्या मध्यापर्यंत ठळक व लांब अशी एक सीमांत रेघ असते, तीच पुरुषाची आत्मरेखा होय; त्याच्या वरच्या बाजूस हाताच्या पाठिमागल्या भागापासून आरंभून तळहात भरून मध्यभागीं अंगठा आणि अनामिका ह्यांच्या मध्यभागापर्यंत वायव्याग्नेय अशी रेघ असते, तीच स्त्रीची आत्मरेखा होय; ह्या पुरुषस्त्रीरेघांचीं दोन्हीं शेवटें अंगठा आणि तर्जनी ह्यांच्या मधोमध जुळलेलीं असतात. त्या योगेंकरून दंपती अनुकूल राहतात. त्या रेघा न मिळतां निरानिराळ्या असल्यास स्त्री पुरुषें मिळून राहत नाहींत. तसेंच त्या रेघांस आडव्या रेघांचा सूक्ष्म संबंध असून तुटक तुटक रेघा असल्यास तसल्याचा विवाह होणार नाहीं, झाला तरी उपयोग होणार नाहीं. पुरुषरेखा स्त्रीरेखेच्या पुढें गेली असल्यास पुरुषसंतति अधिक प्रबल असते, आणि स्त्रीरेखा पुरुषरेखेच्या पुढें असल्यास कन्यासंतति अधिक असते. उभय रेखा सम असल्यास सुत्यसंतती नाहीं. अंकुर ( पुढें गेल्या ) रेघेस कातरी असल्यास संतति भग्न होते, फांटा असल्यास दत्तकसंतति लागेल; तुटक असल्यास परसंतति असते; स्त्रीपुरुषरेघांमध्यें कातरीचा स्पर्श असल्यास स्त्रीपुरुषसंभोग अंतरतो. पुरुषरेखेस मिळाल्यास स्त्री परपुरुषरत होईल; पुरुषरेखा विच्छिन्न असल्यास बायको विधवा

होईल अथवा विधवा झाल्यावर पुनर्विवाह होईल. स्त्रीरेषेंत मिळाल्यास पति परस्त्रीरत होईल, मिळालेली रेघ शेवटपर्यंत असल्यास सवत असते, विच्छिन्न असल्यास तिचें आयुष्य संपून नवऱ्याचें दुसरें लग्न होईल. याप्रमाणें स्त्रीपुरुषरेषेवरून दंपत्याचें विवाहफल सांगावें ॥ २२ ॥

**स्त्रीरेखोत्तरहस्तस्य मध्ये तिर्यक् प्रसारिणी ॥**
**पूर्णा हस्तांतमारभ्य तर्जनीमध्यमांतरे ॥ २३ ॥**
**यातिशाखान्विता वल्ली यद्वदायुष्यरेखिका ॥**
**पूर्णा शतायुषं दद्यादंतरे मध्यमायुषं ॥ २४ ॥**
**कुरुते पुरुषं कंचित्सच्छिद्राकालजां मृतिं ॥**
**सकंटकत्वे विपदो नीरंध्रत्वे तु जीवनं ॥ २५ ॥**

**अर्थ**—स्त्रीरेखा आणि बोटें यांच्यामध्यें असणारी हस्ताच्या तृतीयभागीं आणि मुठीच्या बुडाच्या कोपऱ्यापासून आडवी उभी अशी तर्जनी आणि मधलें बोट ह्यांच्या मध्यकोनांत मिळणारी डहाळ्यासहीत वेलीसारखी छिद्ररहित अशी आयुष्यरेखा असते. ती शंभर वर्षें पूर्णायुष्य सूचविते. ती रेषा अर्धी असल्यास ५० वर्षें, कनिष्ठिकेच्या समभागास छिन्न झाली असल्यास १६ वर्षांपेक्षां कमी. तिजपेक्षां आलीकडेच खुंटली असल्यास अल्पायुष्य. त्या रेखा अस्पष्ट असल्यास अपमृत्यु त्यांच्या प्रमाणानें संभवतात. तीच रेघ अनेक फांट्यांनीं युक्त असूनही वेणीच्या आकाराची अछिद्र असल्यास अपमृत्यूचाही परिहार होतो ॥२५॥

**करमूलं समारभ्य स्वचायुष्याग्रोर्ध्वमूर्छिता ॥**

मध्यमानामिकासंधिं प्राप्तैका ऋजुरेखिका ॥२६॥
धनजीवनदा ज्ञेया तत्पूर्णत्वे महाधनी ॥
आदिमध्यांतभागेषु यत्रारब्धा तदादिगा ॥२७॥
यत्रैव पर्यवस्येत तावत्धनमुदीरयेत् ॥
तिर्यक् चेत्कर्तरीरेखा धनभंगं विनिर्दिशेत् ॥२८॥
कर्तरीत्रितयं प्रोक्तं महादारिद्र्यसंज्ञकं ॥
आयुर्योगे जीवनांतं स्त्रीयोगे तु सुखावधि ॥२९॥
संयुक्तरेखानुरूपं धनप्राप्तिनिमित्तकं ॥
सर्वथा तादृशी रेखा नास्ति यस्य करांतरे ॥३०॥
वराटिकापि तत्धस्ते क्षणमात्रं न तिष्ठति ॥
परंत्वितरसद्योगलक्षणैर्धनमाप्नयात् ॥ ३१ ॥
अभावे धनरेखाया धनीति नहि कीर्त्यते ॥
व्ययोपि सुमहान् भूयादेष जीवननिर्णयः ॥३२॥

**अर्थ**—तळहाताच्या मध्यभागीं मणिबंधाच्या कंकणरेखेपासून मधलें बोट आणि अनामिका ह्यांच्या सांध्यापर्यंत नीट लांब अशी स्त्रीसीमांतरेखेस व आयुष्यरेखेस लागून स्पष्टरीतीनें वरच्या भागीं व्यापिली असते, तीच धनजीवनरेखा; ती संपूर्ण असल्यास गर्भश्रीमंत होऊन यावज्जीवपर्यंत श्रीमान् असतो. त्यास कात्री असल्यास धनभंग होतो; प्रबल अशा तीन कात्री असल्यास ( कात्रीसारखे फांटे असल्यास तो आमरण निर्धन असतो. त्या रेघेचे तीन भाग कल्पून आदिमध्यांत भागांत कोठून रेखारंभ होईल तेथें आयुष्यांत तितक्या भागाच्या वयांत धनसंपादन क-

रून उपजीविकेचा योग प्राप्त होतो. ज्या भागांत समाप्त होते त्या भागाचे वयांत धनसंपादनयोग संपतो. त्याच रेघा खंडखंड झाल्या असतील तर त्या त्यावेळीं मधून मधून प्राप्त होणारा धनयोगही किंचित् किंचित् असतो. त्या धनरेघेच्या फांट्यांत ज्या ज्या रेघेचा संपर्क होईल त्या त्या विषयमूलकाप्रमाणें धनसंपादन होतें. ह्मणजे हलरेखासंपर्क असल्यास कृषिकर्ममूलक, तटाकरेखासंपर्कास तटाकमूलक, पशुरेखासंपर्कास पशुमूलक, मुद्रारेखासंपर्कास अधिकारमूलक, ध्वजरेखासंपर्कास शौर्यमूलक, विद्यारेखेचा संपर्क असल्यास विद्यामूलक, याप्रमाणें संबंधरेखा पाहून धनार्जनास कारण जो जीवनोपाय तो धरावा. धनरेखा सर्वत्र नसल्यास तशा पुरुपास धनलाभ व जीवनोपाय नसतो. सूक्ष्म असल्यास किंचिन्मात्र असतो. पितृरेखासंपर्कास पित्रार्जितधनलाभ, याप्रमाणें बंध्वादिरेखांसंबंधानें, बंध्वादिकांपासून धनलाभ होतो. धनरेखेचें मूळ आणि पुरुषरेखेचें मूळ, मिळालेलें असल्यास आपण मिळविलेल्या धनापासून जीवन होतें. आरंभीं दोन्ही रेखा निरनिराळ्या असून त्यांस आणखी दोन संबंधरेखा दीर्घ चतुरस्त्रादि कोनरूपानें मिळाल्या असल्यास कष्टार्जित धनलाभ. त्यांत कलशरेखा, अंकुशरेखा, ह्या सर्व मिळाल्या असल्यास निधिनिक्षेपलाभ. धनरेखेस किरीटरेखा मिळाली असल्यास खंडणी येईल. सिंहासन रेखा मिळाली असल्यास राजद्रव्यलाभ, तुळारेखा मिळाली असल्यास वाणिज्यवृत्तिपासून लाभ, आयुधरेखा मिळाली असल्यास शिल्पविद्येपासून धनलाभ, छ-

त्ररेखा मिळाल्यास प्रभुत्वमूलक धनलाभ, शकटरेखा मिळाल्यास वाहनापासून धनलाभ, नौकारेखा मिळाल्यास जलयानापासून धनलाभ, याप्रमाणें पाहून समजावें. त्रिशूल, डमरु, कपालरेखा मिळाल्या असल्यास भिक्षुक होतो. धनरेखा स्त्रीरेखेपर्यंतच संपल्यास स्त्री जीवंत असेपर्यंत धनसंपादन करितो, तीच रेखा आयुष्यरेखेपर्यंत जाऊन संपल्यास आपण जीवंत असेपर्यंत द्रव्य संपादितो. आयुष्यरेखेच्या वरही असल्यास धन संपादून मुलाबाळांस सुद्धां द्रव्यप्राप्ति करून देतो ॥ ३२ ॥

या धनरेखेचें फल ग्रंथांत अजूनही विशेष आणि सूक्ष्म समजून घेऊन संगृहीत करावें.

**पुंस्त्र्यायुर्धनरेखास्तु चतस्रः प्रकटाः करे ॥**
**मध्ये त्ववांतरं लक्ष्म नराणां फलनिर्णये॥३३॥**

**अर्थ**—पुरुषरेखा, स्त्रीरेखा, आयुष्यरेखा, धनरेखा, ह्या चारही रेघा तळहातांत स्पष्ट व पूर्ण समजून घ्याव्या. त्यांच्यामध्यें असणाऱ्या स्थळांत अवांतररेखा त्या त्या वेळेस उत्पन्न होऊन फलानुभव संपल्यावर नाहींशा होतात. कितीएक उत्पन्न होऊन प्रथम स्वाभाविकपणें असून कांहीं वेळानंतर पुसून जातात. कितीएकांचा मध्येंच आरंभ होऊन यावज्जीव राहतात. ह्या सर्वही कितीएक अव्यक्त होऊन व कितीएक सूक्ष्म होऊन आणि कितीएक स्पष्टपणें असून आपापल्या स्वरूपानुरूप शुभाशुभ फळें सुचवितात. त्यांचें स्पष्टीकरण कालनिर्णयरेखेच्या स्वरूपपरिमाणानें अनुभावानुसाररूप लोकरीतीप्रमाणें हिशेबानें समजावें ३३

गिरिर्गजोंकुशं शंखं कुंडलं चंद्रसूर्यकौ ॥
योनिरांदोलिका चैव कंकणं चाविमस्तकं ॥३४॥
नेत्रं च स्वस्तिकं शूलं किरीटं पानभाजनं ॥
कर्कटः परशुश्चेति रेखा अंगुष्ठमूलगाः ॥ ३९ ॥
स्त्रीपुंधनांतरे रेखा अष्टकोणं त्रिशूलकं ॥
वेदिका मानुषशिरः कमलं धनुरेवच ॥ ३६ ॥
सर्पश्च भेदिनी पुस्तं वीणा चैव त्रिकोणकं ॥
वर्तुलं च तटाकं च स्वस्तिकं च विनिर्दिशेत्॥३७॥
स्त्रीसीमाधनमध्ये तु तुला च गजमस्तकं ॥
हलमश्वो मंदिरं च ग्रामो डमरुकांकुशौ ॥ ३८ ॥
कलशः पुस्तकं खड्गमित्यादिकमुदीरयेत् ॥
प्राक्दक्षिणांतरे चायुर्नारीवित्तांतरालगे ॥३९॥
प्रदेशे गोपुरछत्रदेवालयसमाः स्मृताः ॥
धनुर्घंटादिका रेखा विज्ञातव्या मनीषिभिः ॥४०॥
आयुर्नार्यंतरे वित्तस्योदीच्यां रथसंज्ञकां ॥
नौकां च कमलं बाणं गदामपि च कीर्तयेत्॥४१॥
आयूरेखोपरिष्टात्तु किरीटं ध्वजमेव च ॥
विद्यां सिंहासनं वल्लीं चित्ररेखां विनिर्दिशेत्॥४२॥
कुलिशाद्यास्तथा रेखा निर्दिष्टा हस्तमध्यगाः ॥
रेखा अप्युनुरेखाश्च उपरेखाश्च सूक्ष्मगाः ॥ ४३ ॥
प्राणिकर्मानुसारेण देहजाः फलसूचकाः ॥
विस्पष्टं परिदृश्यंते कर्मकृद्धस्तमध्यगाः ॥४४॥
स्वरूपानुगुणं तासां फलं वाच्यं मनीषिणा ॥

विरुद्धफलयोर्योगे प्रबलस्यैव संभवः ॥ ४५ ॥
तदेकफलयोर्योगे प्राबल्यं परिकीर्तयेत् ॥
गजाश्वांदोलिकाछत्रचामरध्वजवाहनं ॥ ४६ ॥
सिंहासनादिकं ज्ञेयं रेखातो राजलक्षणं ॥
चंद्रार्कगोपुरादीनि देवालयमुखं तथा ॥ ४७ ॥
दैविकं लक्षणं ज्ञेयमायुधं शूरलक्षणं ॥
जलजंत्वादिके भाग्यं वाणिज्योपकृतौ धनं ॥४८॥
जलोपकरणे सौख्यमविमस्ते तथामिषं ॥
हलादिके कृषिर्ज्ञेया गिरिग्रामादिके प्रभुः ॥४९॥
किरीटं पुस्तकं वल्ली चित्रध्वजसमुद्भवाः ॥
पांडित्यलक्षणारेखा मस्तकं चौर्यलक्षणं ॥ ५० ॥
धनकृत् कलशः सर्पो वीणा गायनलक्षणा ॥
जीवहिंसाकरः पाशः पानकृत् पानभाजनं ॥५१॥
विषमं च चतुष्कोणं शिल्पसेवकलक्षणं ॥
अष्टकोणतटाकादि कूपखातादिलक्षणं ॥ ५२ ॥
यवादिके तु मिष्टान्नं चक्राद्यं प्रभुलक्षणं ॥
योन्यादिके तु दौर्भाग्यं यूपाद्ये यज्ञशीलता॥५३॥
त्रिशूलादौ भिक्षुकत्वं फलमुच्चावचं वदेत् ॥
स्त्रीणां दक्षिणहस्तस्था पुंसां वामकरस्थिता ॥५४॥
रेखा पुंस्त्रीफले कुर्यात् फलस्य परिवर्तनं ॥
एतदाद्यास्तथा रेखा ऊर्वाद्यन्यांगसंस्थिताः॥५५॥
तथा पादतले सर्वं फलं वाच्यं पृथक् पृथक् ॥
रेखासमीकृतौ शस्तं वैकृते विकृतं फलं ॥ ५६ ॥

मालिन्ये त्वप्रकाशः स्यादेतत्सामुद्रिकं स्मृतं ॥
तत्र देवांशसंभूतं दैवलक्षणलक्षितं ॥ ५७ ॥
राजलक्षणयुक्तं च महापुरुषमीरयेत् ॥
नारी च तादृशी ज्ञेया देशकालानुमानतः ॥५८॥
पूर्वमायुः परीक्षेत पश्चाल्लक्षणमीरयेत् ॥
आयुर्हीननराणां तु लक्षणं किं प्रयोजनं ॥ ५९ ॥
नवरंध्राणि हस्तांघ्रिपृष्ठनाभिशिरोवपुः ॥
कंठवक्षोदरोर्वादि सहरेखं परीक्षयेत् ॥ ६० ॥
स्वरं दृष्टिं च शीलं च विज्ञाय फलमीरयेत् ॥
रेखैव ह्यैश्वरी मुद्रा शरीरं हि समुद्रकं ॥ ६१ ॥
एतत्सामुद्रिकं शास्त्रं संग्रहेण समीरितं ॥

समाप्तमिदं प्ऱ्हादप्रणीतम् हस्तसामुद्रिकं.

अर्थ—पर्वत, गज, अंकुश, शंख, कुंडल, चंद्र, सूर्य, योनि, पालखी, कंकण, अविमस्तक ( बकऱ्याचें मस्तक ), नेत्र, स्वस्तिक, शूल, किरीट, पानपात्र, कर्कट, ( खेकडा ), परशु, इत्यादि रेखा अंगठ्याचे खालीं असावयाच्या. अष्टकोण, त्रिशूल, वेदिका, ( यज्ञाकरितां घातलेलें बोहलें ) नरमस्तक, कमल, धनुष्य, सर्प, भाला, पुस्तक, वीणा, त्रिकोण, शून्य, तटाक, ( तळें ) स्वस्तिक, इत्यादि रेखा, स्त्रीरेखा, पुरुषरेखा, आणि धनरेखा ह्यांच्यामध्यें असावयाच्या. स्त्रीरेखा आणि धनरेखा ह्यांच्यामध्यें, तराजू, गजमुख हल, ( नांगर ) अश्व, गृह, ग्राम, डमरु, अंकुश, कलश, पुस्तक, खड्ग, इत्यादिरेखा असावयाच्या. आ-

युष्यरेखा स्त्रीरेखा, धनरेखा, ह्याच्यामध्यें अंगठ्याचे बाजूस गोपूर, छत्री, देवालय, धनुष्य, घंटा इत्यादिरेखा असावयाच्या.त्याच्या डाव्या बाजूस रथ, जहाज, कमल, बाण, गदा, इत्यादि रेखा असावयाच्या. आयुष्यरेखेच्या वरच्या बाजूस किरीट, ध्वज, विद्या, सिंहासन, लता, ( वेली ), चित्र इत्यादि रेखा असावयाच्या. वज्रादिरेखा मध्यें असतात. रेखा, अनुरेखा, उपरेखा, सूक्ष्मरेखा ह्या, प्राण्यांच्या कर्मानुसार देहांत उत्पन्न होऊन त्या त्या प्रमाणें फळें सुचवितात. तीं कर्मफळें कर्म केलेल्या तळहातांत दिसून सुचवितात. त्या रेखांच्या असणाऱ्या आकारावरून योग्यफळ बुद्धिवानांनीं विचार करून सांगावें. दोन फळें अनेक रेषेपासून विरुद्ध दिसून आल्यास त्यांत प्रबळरेखेचें फळ चालतें, पुष्कळ रेखा जर एकच फळ सुचवितील तर तेंच प्रबळ असें समजावें. गज, अश्व, पालखी, छत्र चामर, वाहन, ध्वज, सिंहासन, किरीट, मुद्रा, खड्ग इत्यादिरेखा राजलक्षणाच्या असतात. यास प्रभुत्व फल जाणावें. चंद्र, सूर्य, गोपुर, देवालय इत्यादि देवलक्षणें समजावीं. आयुधें शूरलक्षणें होत. मीन, मकर, कर्कट हीं भाग्यलक्षणें होत. तराजु, वाणिज्यमूलक धनलक्षण समजावें. अविमुख, मांसविक्रयमूलक धनलक्षण समजावें. हल ( नांगर ) हें कृषिकर्ममूलक धनलक्षण होय. पर्वत, ग्राम, आणि तटाक, कूप, कोट इत्यादिक प्रभुत्वलक्षण समजावें. विद्यारेखा, किरीट, पुस्तक, लता, ध्वज, चित्र, इत्यादिरेखा पांडित्यलक्षणाच्या होत. नरमस्तक, हें चोरलक्षण होय.

वीणा हें संगीतलक्षण जाणावें. कलश, सर्प, हीं भन:पिशाचलक्षणें. पाशरेखा जीवहिंसालक्षण. पानपात्र हें मद्यप्राशनाचें लक्षण. विषमकोण, चतुष्कोण इत्यादि शिल्पसेवकलक्षण, यव गोधूमादिरेखा मिष्टान्नभोजनाच्या जाणाव्या. चक्रादिरेखा भोग, गौरव, प्रभावलक्षण. योन्यादिरेखा दौर्भाग्यलक्षणें होत. यूपादिरेखा यज्ञादिपुण्यकर्मांचीं लक्षणें. त्रिशूलादिरेखा भिक्षालक्षण, याप्रमाणें अनेक जाणावीं. स्त्रियांच्या उजव्या हाताच्या रेखा शुभ असल्यास तें फल पतीचें होय. पुरुषाच्या डाव्या हाताच्या रेखा शुभ असल्यास तें फल स्त्रीचें होय. इत्यादिरेखा मांड्या आदिकरून इतर अंगाचेठायीं तसेंच तळपायावर हीं निरनिराळीं परीक्षून, पाहून सांगावीं. रेखा चांगल्या असल्यास फळ चांगलें समजावें. बिघडल्या असल्यास फळही विकार पावतें.रेखा मळीन असल्यास फळही अप्रकाशित असतें. देवांश चिन्हें आणि राजलक्षणें हीं ज्याचीं असतात, तोच महापुरुष होय. स्त्रीही तशीच समजावी. फलें सांगणें तीं देशकालानुसार योग्य पाहून सांगावीं. प्रथम आयुष्य निर्णय करून मग इतर फलें सांगितल्यास योग्य होतात. आयुर्बल नसणाऱ्यास लक्षणापासून प्रयोजन नाहीं. देहछिद्रें, तळहात, तळपाय, पाठ, नाभि, मस्तक, मान, छाती, पोट, मांड्या, इत्यादि ह्मणजे कुशी आदिकरून शरीर सर्व रेखांनीं व्याप्त झालेलें परीक्षाकरून स्वर, दृष्टि, स्वभाव हीं सूक्ष्मरीतीनें पाहून घेऊन फलांस अनुरूप अशीं सांगावीं. रेखा ह्या देवाच्या मुद्रा व त्यासह

शरीर हाच समुद्र ह्मणून हें शास्त्र सामुद्रिक, हें संग्रहेंकरून सांगितलें ॥ ॥ ६१ ॥

या प्रकारें करून प्रऱ्हादकृत हस्तसामुद्रिक समाप्त झालें.

## अथ प्रऱ्हादकृत अंगसामुद्रीकारंभः

श्रीविष्णुभक्तः प्रऱ्हादः प्राह सामुद्रिकाव्हयं ॥
शास्त्रं तज्ज्ञानमात्रेण जानाति नरयोग्यतां ॥ १ ॥

अर्थ—श्रीविष्णुभक्त जो प्रऱ्हाद त्यानें बदलेलें हें सामुद्रिकशास्त्र याच्या ज्ञानेंकरून ज्ञानी मनुष्य योग्यता जाणतो ॥ १ ॥

सप्ताकिष्कूछ्रितं सांगं शरीरं परिणामि यत् ॥
वर्धते क्षीयते तस्य रेखाः स्युर्भोगसूचकाः ॥२॥

अर्थ—सात विती मनुष्य देह, हा वाढणारा व क्षीण होणारा व सप्तधातूंनीं युक्त, अशा देहांत रेखा ह्या सुखदुःखादि भोगावस्था सूचवितात ॥ २ ॥

आकारसौष्ठवं चैव तथांगपरिमाणकम् ॥
शब्दादिकान् गुणांश्चापि रेखाः सर्वांगसंभवाः ३
स्त्रीपुंलक्षणमित्येवं पंचभिः कारणैः पृथक् ॥
त्रैकालिकफलं ज्ञेयं सप्रमाणानुमानतः ॥ ४ ॥

अर्थ—सुबक आकार, बेताबाताचें शरीर, शब्द स्पर्शादि शारीरिक गुणविशेष, सर्वावयवांमध्येंही दृश्य

होणाऱ्या रेखा असणें हीं स्त्री व पुरुष लक्षणें ह्मणा- वयाचीं; ह्या पांचही कारणांवरून प्रमाणानुसारानें मनुष्यांचीं भूतभविष्यवर्तमान फळें कल्पना करून समजावीं ॥ ४ ॥

अंगसामुद्रिकं चैव हस्तसामुद्रिकं तथा ॥
स्त्रीसामुद्रिकमित्येव त्रिधा शास्त्रं प्रचक्षते ॥५॥

अर्थ—अंगसामुद्रिक, हस्तसामुद्रिक, आणि स्त्री- सामुद्रिक याप्रमाणें तीन प्रकारचें सामुद्रिकशास्त्र आहे ५

नैसर्गिकं कालजं च चिन्हं नैमित्तिकं तथा ॥
कालदेशानुमानेन ज्ञात्वा फलमुदीरयेत् ॥ ६ ॥

अर्थ—जन्मारंभापासून साधारण असणारी खूण वयोवस्थेमध्यें शुभाशुभ कालानुसार आपोआप होणा- री खूण, कांहीं निमित्तानें झालेली खूण, ह्या समजून घेऊन कालदेशानुसारमानानें फल सांगावें. ॥ ६ ॥

लिपिःपैतामही ज्ञेया रेखा अंगांगसंभवा ॥
यया शुभाशुभं नृणां प्रतिबिंबवदीक्ष्यते ॥ ७ ॥

अर्थ—ज्या रेखा सामुद्रिकशास्त्रानें मनुष्याचें शु- भाशुभफल आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें समजून येतें तसल्या रेखाच ब्रह्मलिपि ह्मणून समजाव्या ॥ ७ ॥

पादादिमूर्धपर्यंतं सूत्रेण परिमापयेत् ॥
सप्ताकिष्कूल्लितं शस्तं व्यामांतरमथापि वा ॥ ८ ॥
समत्वं नाभिमध्यत्वे ऊर्ध्वाधिक्ये तु शौर्यभाक् ॥
आधिक्ये त्वधरांगस्य जंघालो वेगवान् भवेत् ९
नाभेर्हृदयपर्यंतं हृदयान्नासिकाग्रतः ॥

स्तनांतरं समं तस्य द्विगुणं मूर्धवेष्टनं ॥ १० ॥
कंवपृष्ठात्स्तनाग्रांतमथवा मस्तवेष्टनं ॥
बाव्हंतरसमं कंठं बाहुराजानुलंबवान् ॥ ११ ॥
भ्रूमध्याच्चुबुकाग्रांतं ललाटं तिर्यगुच्यते ॥
ललाटोर्ध्वपरीमाणं नासादिचुबुकांतरं ॥ १२ ॥
नेत्रकर्णांतरं सूक्ष्मं भ्रूयोरप्यतरं महत् ॥
तर्जनीतुलिता नासा कर्णौ मध्यमया समौ ॥१३॥
मध्यं शिरःसमं यस्य पादो हस्तमितस्तथा ॥
लिंगं दशांगुलायामं स पुमान पुरुषोत्तमः ॥१४॥
बुद्धिमान् भाग्यवांश्चैव शौर्यधैर्यपराक्रमी ॥
ललाटरेखाबाहुल्ये दीर्घायुर्दृढगात्रवान् ॥ १५ ॥
प्राबल्ये धमनीनां च जागरूको भवेन्नरः ॥
अस्थिस्थौल्ये बलाधिक्यं सूक्ष्मदंतः सुभोजनः१६
शातजिव्हस्तु वाग्मी स्यादेतत्सामान्यलक्षणं ॥
विशेषलक्षणैर्ज्ञेयं तत्तत्सामुद्रिकं शुभं ॥ १७ ॥

अर्थ—पायाच्या बोटांपासून मस्तकापर्यंत सूत्रानें मोजून तें सूत्र त्याच्या सात विती असल्यास चांगलें, अथवा त्याच्या वांवेबरोबर असल्यासही चांगलें. त्याच्या अर्ध्याबरोबर नाभि असल्यास त्यास समदेही ह्मणावें. नाभीवरचें माप अधिक असल्यास शौर्यवान् होईल. खालचें माप अधिक असल्यास शीघ्रगामी होईल. नाभीपासून हृदयापर्यंत व हृदयापासून नासिकाग्रापर्यंत जितकें माप असेल तितक्या सूत्राबरोबर स्तनांचें अंतर असावें. मस्तकाचा परिघ त्याच्या दु-

प्पट असावा. मानेच्या वरल्या भागापासून स्तनाग्राप-र्यंत लागणारें सूत मस्तकाच्या परिघाबरोबर ही झा-ल्यास होईल. बाहूच्या अंतराळ सूत्रा इतकें मानेच्या सभोंवारचें माप असावें. बाहू पायाच्या ढोंपरापर्यंत लांब असावे. चुबुकाग्रापासून भ्रूमध्यापर्यंत जितकें अंतर असेल तितकें लांब कपाळ असावें. चुबुकापासू-न नासाग्रापर्यंतच्या अंतरा इतकें उभें लांब कपाळ असावें. आकर्ण नेत्र असावे. भ्रूमध्यें थोडें अंतर अ-सावें. तर्जनी इतकें लांब नाक, मध्यमे इतके कान, मस्तकपरिघा इतकी कंबर, वीतभर पाय, दशांगु-ळ प्रमाण लिंग, हीं लक्षणें असल्यास तो सर्व मनुष्यां-मध्यें उत्तम भाग्यवान्, बुद्धिमान्, शौर्यधैर्य पराक्र-मादि गुणसंपन्न होईल. कपाळावर आडव्या रेघा पुष्कळ असल्यास दृढशरीरी व पुष्कळ वर्षें वांचणारा होईल. शिरा पुष्ट असल्यास जागरूक असतो, अस्थि स्थूल असल्या तर बलवान्, दांत बारीक असल्यास सुभोजन करणारा, व जीभ पातळ असल्यास वक्तृत्व-शक्ति अधिक असते, याप्रमाणें सामान्यरीतीनें सामु-द्रिक समजावें. विशेष लक्षणांकरून देहसामुद्रिक ह-स्तसामुद्रिक व स्त्रीसामुद्रिक हीं पृथक् पृथक् परीक्षेनें समजावीं ॥ १७ ॥

**पंचदीर्घं चतुर्ह्रस्वं पंचसूक्ष्मं षडुन्नतं ॥**
**सप्तरक्तं त्रिगंभीरं त्रिविस्तीर्णं प्रशस्यते ॥१८॥**
**आयुरारोग्यसौभाग्यराज्यबंधुसमृद्धिकृत् ॥**

**अर्थ**—शरीरामध्यें बाह्वादि अवयवांत पांच मोठे,

चार लहान, पांच सूक्ष्म, सहा उन्नत, सात रक्तवर्ण, तीन गंभीर, तीन विस्तीर्ण असल्यास; आयुष्य, आरोग्य, सौभाग्य, राज्य, बंधु यांची समृद्धि असते.

**स्तनयोरंतरं चैव कराक्षिहनुनासिकं ॥ १९ ॥**
**दीर्घं यस्य स लक्ष्मीवान् पंचदीर्घं इति स्मृतः ॥**

**अर्थ**—उभयस्तनांचें अंतर हस्त, नेत्र, हनुवटी, नाक हीं पांचही ज्याचीं दीर्घ असतात तो धनवान् असतो.

**ग्रीवा च जघनं पृष्ठमूलं जंघे तथैव च ॥ २० ॥**
**न्हस्वाणि यस्य चत्वारि पूजामाप्नोति मानवः ॥**

**अर्थ**—मान, जघन, पाठीचे बूड, पायाच्या पिंड्या हीं चारही ज्याचीं लहान असतात तो पूज्यमान् होतो.

**सूक्ष्माण्यंगुलिपर्वाणि केशदंतनखत्वचः ॥ २१ ॥**
**दीर्घायुषो नरा येषां पंच सूक्ष्मत्वलक्षणाः ॥**

**अर्थ**—बोटांचीं शेवटें, केश, दांत, नखें, त्वचा लहान,पातळ व सूक्ष्म असल्यास तो नर दीर्घायु असतो.

**कक्षः कुक्षिश्च वक्षश्च घ्राणस्कंधललाटकं ॥ २२ ॥**
**सर्वभूतेषु निर्दिष्टं तद्वर्धिष्णु षडुन्नतं ॥**
**यशस्विनो महावीर्या धनिनश्च भवंति ते ॥ २३ ॥**

**अर्थ**—बगला, पोट, छाती, नाक, खांदे, कपाळ हीं ज्यांचीं फुगीर असतात तीं मनुष्यें यशस्वी, भाग्यवंत, व बलवीर्य संपन्न होतात. ॥ २४ ॥

**पाणिपादतले रक्ते नेत्रांते च नखास्तथा ॥**
**तालुजिव्हाधरोष्ठानि सप्तरक्तं श्रियःप्रदं ॥ २४ ॥**

**अर्थ**—तळहात, तळपाय, नेत्रांचे कोंपरे, नखें, टाळू, जीभ, ओठ, हीं सात ज्याचीं आरक्त असतात तो लक्ष्मीवान् होतो ॥ २५ ॥

**स्वरः सत्वं च नाभिश्च त्रिगंभीरं गुरुत्वकृत् ॥**
**उरः शिरो ललाटं च त्रिविस्तीर्णं महत्वकृत् २५**

**अर्थ**—स्वर, सामर्थ्य, नाभि, हीं तीन गंभीर असल्यास गौरवातें पावतो. छाती, कपाळ, मस्तक हीं तीन विस्तीर्ण असल्यास श्रेष्ठत्व पावतो ॥ २९ ॥

**महच्छिरो रोमहीनं विशालं च ललाटकं ॥**
**दीर्घकर्णं तुंगनासं शूरपंडितलक्षणं ॥ २६ ॥**

**अर्थ**—मोठें डोकें, रोमहीन व विशाल कपाळ, मोठे कान, लांब नाक, हीं शूरांचीं व पंडितांचीं लक्षणें होत ॥ २७ ॥

**मृदुपाणिपदश्चैव स्थिरकार्यकरस्तथा ॥**
**धृतिमान् जागरूकश्च धनवान् भवति ध्रुवं ॥२७॥**

**अर्थ**—तळहात, तळपाय, मऊ असून स्थिरकार्य करणारा असा, जागरूक, धैर्यवान्, आणि धनवान् होतो ॥ २८ ॥

**दीर्घांगुलिर्गुल्फसमः स्वेदहीनपदस्तथा ॥**
**आरक्तनिर्मलनखो धनवान् राजपूजितः ॥२८॥**

**अर्थ**—लांब बोटें, समानगुल्फ ( सारखे घोटे ) घर्मरहित पाद, निर्मळ आणि आरक्त अशीं नखें याप्रमाणें असणारा पुरुष श्रीमान् आणि राजपूजित होतो ॥ २९ ॥

**आरक्तमृदुनीरंध्रऋज्वंगुलकरांघ्रिकः ॥**
**अस्विन्नपाणिपादश्च भाग्यवान् भवति ध्रुवं ॥२९॥**

**अर्थ**—बोटांचीं शेवटें आरक्त, मृदु, सांधे जुळलेले असे हात पाय असून घर्म न येणारे असे असल्यास तसला मनुष्य खचित भाग्यवान होतो ॥ २९ ॥

**दीर्घपाच्छूर्पकर्णश्च सच्छिद्रांगुलिकस्तथा ॥**
**दुर्बलः शुष्कजघनो दुःखभाग्भवति ध्रुवं ॥ ३० ॥**

**अर्थ**—सुपाप्रमाणें रुंद कान, लांब व लठ्ठ पाय, विरळ बोटें, शुष्क जघन असला मनुष्य निःसंशय दारिद्र्य व दुःख भोगील. ॥३० ॥

**कूर्मपृष्ठप्रपदवान् किंचिदुष्णांघ्रिरेवच ॥**
**सद्बुद्धिः सुंदरो यश्च स भवेज्जनवंदितः ॥ ३१ ॥**

**अर्थ**—कांसवाच्या पाठीप्रमाणें पायाचीं बोटें रुंद व सुंदर आणि उष्ण असल्यास बुद्धिवान् व लोकपूज्य होतो. ॥ ३१ ॥

**पादांगुष्ठाद्द्वितीयस्तु दीर्घायद्यंगुलिर्भवेत् ॥**
**बहुस्त्रीरमणोभूयान्मृदुप्रपदवान् सुखी ॥ ३२ ॥**

**अर्थ**—पायाच्या अंगठ्यापेक्षां त्याच्या शेजारचें दुसरें बोट लांब असल्यास तो बहुस्त्रीभोगशाली होतो व पायाचे घोटे मऊ असल्यास सुखी होतो.

**पादांगुलीषु वक्रासु विरलासु च शोकभाक् ॥**
**आरक्तनखरो भूस्थो भूयाद्वक्रनखः खलः ॥३३॥**

**अर्थ**—ज्याचीं पायाचीं नखें लाल असतात, तो भूस्थितिमान् होतो. नखें वक्र असल्यास दुष्ट होतो.

पायाचीं बोटें वांकडीं असून विरळ असतील तर शो-
कयुक्त होतो. ॥ ३४ ॥

**हारिद्रनखरो भूयाद्दुराचाररतो नरः ॥**
**रोगी तु नीलनखरो रिक्तश्च शिथिलो नखैः ३४**

**अर्थ**—पिंवळीं नखें असणारा पुरुष हत्यादि दु-
राचार करणारा होतो. निळया रंगाचीं नखें असणा-
रा रोगी होतो. शिथिल नखांचा गरीबींत असतो ३४

**दीर्घा कनिष्ठिका यस्य नखरोऽरुणसन्निभः ॥**
**धनवान् राजमान्यश्च भूपालो भवति ध्रुवं ॥३५॥**

**अर्थ**—पायाची किरांगुळी लांब व नखें लाल अ-
सल्यास धनिक असा प्रभु होईल ॥ ३५ ॥

**तूणीरसन्निभा जंघा बाहुः करिकरोपमः ॥**
**नेत्रे च पद्मपत्राभे स पुमान् राजलक्षणः ॥ ३६ ॥**

**अर्थ**—भात्या ( बाण घालण्याची पिशवी ) प्रमाणें
ज्याचीं पादखंडें ( पिंडऱ्या ) हत्तीच्या सोंडेप्रमाणें
ज्याचे बाहू, कमलदलाप्रमाणें ज्याचे नेत्र, असला
मनुष्य राजलक्षणाचा म्हणावा ॥ ३६ ॥

**सशब्दमूत्रोत्सर्गश्च मध्यसौरभशुक्रवान् ॥**
**धनवान् पुत्रवान्भूयाद्रेतोदौर्गंध्यतोऽन्यथा ॥३७॥**

**अर्थ**—सशब्द मूत्रोत्सर्ग होणें, मध्यम गंधयुक्त
शुक्र ( वीर्य ) असणें हीं लक्षणें धन आणि संतान-
सूचक जाणावीं. वीर्य दुर्गंध असल्यास धन संतान
लाभत नाहींत ॥ ३७ ॥

**समांडत्वे सुखं चायुर्ह्रस्वांडत्वे प्रभुर्भवेत् ॥**

**वक्रांडत्वे सेवकश्च चर्मांडात्सुनपुंसकः ॥ ३८ ॥**

**अर्थ**—वृषण सम असल्यास आयुष्मान् व सुखी होतो. लहान असल्यास प्रभुत्व पावतो. वक्र असल्यास सेवक होतो. चर्मयुक्त असल्यास नपुंसक होतो ३८

**स्याद्वामावर्तनाभिस्तु दरिद्रो दक्षिणे धनी ॥**
**वलिमध्ये तु नाभिश्चेन्निर्धनः पापकर्मभाक् ॥३९॥**

**अर्थ**—नाभि ( बोंबी ) डाव्या फेराची असल्यास दरिद्री, उजव्या फेराची असल्यास धनिक, पोटाच्या घड्यामध्यें बुजली ( शिरली ) असल्यास निर्धन आणि पापकर्मी होईल ॥ ३९ ॥

**उदरे वलिरेखा चेच्छस्त्रघातो भविष्यति ॥**
**वलिद्वये स्त्रीविजयी त्रितये बहुभोगभाक् ॥४०॥**
**शूरश्चतुष्टये भूयात् फलमेवं पृथक् पृथक् ॥**
**पार्श्वे त्वस्थिमये रिक्ते भोगवान् भवति ध्रुवं ४१**

**अर्थ**—पोटावर एक वळी असल्यास शस्त्रघात होतो, दोन असल्यास स्त्रीजित होतो, तीन असल्यास बहुभोगी होतो, चार असल्यास पराक्रमी. तसेंच कुशीच्या बरगड्या दिसत नसल्यास भोगवान् जाणावा.

**अदर्शने तु नाडीनां सुखभोजनमादिशेत् ॥**
**उत्तुंगचूचुकोभूयादनपत्यश्च दुःखभाक् ॥ ४२ ॥**

**अर्थ**—अंगावरच्या शिरा झांकलेल्या असल्या तर सुखभोजन करणारा होईल. स्तनांचीं अग्रें वर उचललीं असून फुगीर असल्यास पुत्र नसल्यानें दुःख भोगील ॥ ४२ ॥

**मणिबंधत्रिरेखस्तु मणिभूषणभाग्भवेत् ॥**
**साधारणो द्विरेखः स्यादेकरेखस्तु भिक्षुकः ॥४३॥**

**अर्थ**—हाताच्या मणगटावर तीन रेघा असणारा हस्तभूषणें भोगील. दोन रेघा असल्यास साधारण जाणावा. एक रेघ असेल तर भिक्षुक होईल ॥४३॥

**द्वात्रिंशद्दंतवान् भोगी त्रिंशन्न्यूने तु निर्धनः ॥**
**कपटी रोमहीनश्च बहुरोमा तु बंधभाक् ॥ ४४ ॥**

**अर्थ**—३२ बत्तीस दांत असतील तर भोगवान्. व तिसांत कमी असतील तर दरिद्री होईल. तसेंच अंगावर केंस नसणारा कपटी, अंग केसाळ असल्यास बंध भोगील. अर्थात साधारण मध्यम स्थिति असावी.

**कुबेराक्षसमाक्षश्च निष्ठुरो निर्धनस्तथा ॥**
**बिडालतुल्यनेत्रस्तु पश्येन्निध्यंजनादिकं ॥ ४५ ॥**

**अर्थ**—गजग्यासारखे डोळे असणारा निर्धन, तसाच मांजरासारखे डोळे असणारा निक्षेपांजन ( पुरलेलें द्रव्य पाहणारा ) योग्य समजावा ॥ ४५ ॥

**यस्य भालतले रेखाः पंच पूर्णायुरुच्यते ॥**
**विंशत्यब्दास्तथैककं समरेखो धनी भवेत् ॥४६॥**

**अर्थ**—कपाळावर एक रेखा असेल तर २० वर्षें आयुष्य, दोन असतील तर ४० वर्षें आयुष्य व धनवान्, तीन असतील तर ६० वर्षें आयुष्य व साधारण भोगी, चार रेखा असतील तर ८० वर्षें आयुष्य व धनिक, पांच असतील तर पुर्णायुषी पण गरीबींत काळ घालवील ॥ ४६ ॥

**पृष्ठावर्ते तु पंचाशत् पार्श्वावर्ते तु सप्ततिः ॥**
**ऊर्ध्वावर्ते तथाल्पायुः केशानां शिरसि ध्रुवं ४७**

**अर्थ**—डोकींत मागच्या बाजूस भोंवरा असेल तर ५० वर्षे, बगलेस असेल तर ७० वर्षे आयुष्य व ऊर्ध्व-मार्गी असल्यास अल्पायु याप्रमाणें समजावें ॥ ४७ ॥

**विंशत्यब्दोत्तरावर्ते क्षिप्रमेव मरिष्यति ॥**
**त्रिंशदब्दोत्तरावर्ते चिरजीवी भवेन्नरः ॥ ४८ ॥**

**अर्थ**—वीस वर्षें झाल्यावर भोंवरा उमटल्यास लौकर मरेल, तीस वर्षें झाल्यावर उमटल्यास चिरंजीव होईल ॥ ४८ ॥

**लोमकूपे तु लोमैक्ये भूपालो भवति ध्रुवं ॥**
**धनी लोमद्वये भूरिलोमस्त्वथ च निर्धनः ॥ ४९ ॥**

**अर्थ**—एकेका केंसाच्या भोंकांतून एकेकच केंस असल्यास राज्यप्राप्ति. दोन दोन केंस असल्यास धनिक, याहून अधिक केंस असल्यास दरिद्री होईल ४९

**क्वचिद्रतिः क्वचिन्निद्रो भुंक्तेल्पं क्षिप्रमेव यः ॥**
**चिरस्नायी दीर्घलक्ष्यो भाग्यवान् भवति ध्रुवं ५०**

**अर्थ**—क्वचित् रतिसुख घेणारा, मितनिद्रा करणारा, लौकर आणि अल्प भोजन करणारा, सावकाश स्नान करणारा, दूरदृष्टि देणारा ( पुढील पांच जाणणारा ) याप्रमाणें वर्तणारा खचित भाग्यवान् होईल ॥ ५० ॥

**शयालुरपि संध्यासु हिंसाकर्मरतस्तथा ॥**
**निर्दयो गूढपापश्च दुःखभाग्भवति ध्रुवं ॥ ५१ ॥**

**अर्थ**—संध्याकाळीं निजणारा, जीवहिंसा करणारा, दया नसणारा, तो पापकर्म प्रीतीनें करील व दुःख भोगील ॥ ५१ ॥

**भ्रूनासाजानुहनुदोर्दीर्घत्वे कंठजंघयोः ॥**
**रसनाया मेहनस्य ऱ्हस्वत्वे भाग्यवान् भवेत् ५२**

**अर्थ**—भोंवया, नाक, गुडघे, हनुवटी, बाहू, हीं बेतापेक्षां थोडीं अधिक, तसेंच मान, पायाच्या पिंढऱ्या, जीभ, शिश्न, हीं बेतापेक्षां थोडीं कमी असल्यास भाग्यशाली होईल ॥ ५२ ॥

**चुबुके यस्य रोमाणि न वक्षसि न गंडयोः ॥**
**कुटिलं तं विजानीयात् समर्थं च खलं नरं ॥५३॥**

**अर्थ**—दाढी मिशा मात्र येऊन हनुवटीवर व छातीवर केश न आल्यास तो कुटील व महा दुष्ट होईल ॥ ५३ ॥

**निरुक्तलक्षणानां तु विरोधे त्वन्यथा फलं ॥**
**सत्यधर्मरतश्चैव शुचिः शोभनवान्सुखी ॥ ५४ ॥**

**अर्थ**—वर सांगितलेल्या लक्षणांच्या विरुद्ध लक्षणें असल्यास उक्त फलास विरुद्ध फल होईल. सत्यवान्, पुण्यशील, शूचिर्भूत, असून गोड भाषण करणारा असेल तर सुखी होईल ॥ ५४ ॥

**पादचक्रे तु यात्रावान् भूशायी पार्श्वचक्रभाक् ॥**
**पृष्ठचक्रे भारवाही कुक्षिचक्रे सुभोजनः ॥ ५५ ॥**

**अर्थ**—पायाला चक्र असेल तर यात्रा करणारा, अथवा देशसंचार करणारा होईल. पार्श्वभागीं चक्र

असेल तर जमिनीवर निजणारा होईल. पाठीवर चक्र असेल तर भारवाही होईल. व पोटावर असेल तर मिष्टान्न भोजन करणारा होईल ॥ ५५ ॥

**मृदुत्वे पादतलयोर्भवेद्वाहनसौख्यभाक् ॥**
**देहस्य मार्दवे तद्वच्छय्यासौख्यं लभेन्नरः ॥ ५६ ॥**

**अर्थ**—पाय मऊ असल्यास वाहनसौख्य प्राप्त होईल. अंग मऊ असल्यास शय्यासुख प्राप्त होईल॥५६॥

**कर्णरोमा तु दीर्घायुर्नाभिरोमा बहुप्रजः ॥**
**विकलांगोधिकांगो वा दुःखी लक्षणवर्जितः ५७**

**अर्थ**—कानांत केंस फार असल्यास फार दिवस वांचेल. बेंबींत असल्यास बहुत संतति होईल. अधिक अंग किंवा विकल अंग असल्यास इतर शुभ चिन्हें नसतां दरिद्री आणि दुःखी होईल ॥ ५७ ॥

**यस्य हस्ततलं सम्यक्कठिनं सहि कर्मकृत् ॥**
**उपदंतश्च दुष्टात्मा बंधुनाशेन खिद्यति ॥ ५८ ॥**

**अर्थ**—तळहात कठिण असल्यास तो फार काम करितो. दांतावर दांत असणारा दुरात्मा व बंधूच्या हानीपासून दुःख पावतो ॥ ५८ ॥

**प्रकृतिस्थः समसुखो विपरीते विपर्ययः ॥**
**वर्चस्वी दैवबलवान् क्रौर्ये त्वासुरसंपदः ॥ ५९ ॥**

**अर्थ**—देहप्रकृति बेतवार असल्यास योग्य फळ पावेल. विपरीत असल्यास विपरीत फळ समजावें. मुखकांति सुरेख असल्यास देवताबल असतें. सर्व क्रूरकर्मे हीं राक्षसीसंबंधाचीं असतात ॥ ५९ ॥

अंगसामुद्रिकं ज्ञेयमित्येतच्छास्त्रनिर्णयात् ॥
अन्यसामुद्रिकोक्तानां फलानां तु समुच्चयः ॥६०॥

**अर्थ**—या प्रकारेंकरून उक्तशास्त्राच्या योगानें अंगसामुद्रिक समजावें. इतर सामुद्रिकांचीं फळें याशीं मिळवून सांगावीं ॥ ६० ॥

इदं अंगसामुद्रिकं समाप्तम्.

## अथ प्रऱ्हादकृत स्त्रीसामुद्रिकलक्षणारंभः

अथातः संप्रवक्ष्यामि स्त्रीसामुद्रिकलक्षणं ॥
सुरूपा च सुशीला च दुर्लभा सत्कुलोद्भवा ॥१॥

**अर्थ**—आतां स्त्रीसामुद्रिक लक्षण सांगतों. सुरूप, सुशील, सत्कुलांत उत्पन्न झालेली अशी स्त्री मिळणें दुर्लभ जाणावी ॥ १ ॥

स्फुरच्चंद्रमुखी नारी पद्मपत्रायतेक्षणा ॥
अर्धेंदुनिटिला वक्रभ्रूलता कुटिलालका ॥ २ ॥
चांपेयनासिका कुंदरदना कोमलांगका ॥
बिंबोष्ठी कंबुकंठी च कृशांगी सूक्ष्ममध्यमा ॥३॥
शातोदरी पृथुश्रोणी रंभोरूभाग्यशालिनी ॥
पद्मसदृशपाण्यंघ्रिः सुशीला सुगुणान्विता ॥ ४ ॥
सुगंधा सत्कुलोत्पन्ना लज्जाविनयशालिनी ॥
दयालुर्धर्मनिरता पातिव्रत्यपरायणा ॥ ५ ॥

**यत्र स्यादीदृशी नारी तत्र लक्ष्मीः प्रसीदति ॥**
**आनंदयति सा लोकं पितृभर्तृकुलद्वयं ॥ ६ ॥**

**अर्थ**—चंद्रतेजवत् मुख, कमलपत्राप्रमाणें नेत्र, अर्धचंद्राप्रमाणें कपाळ, वांकड्या भोंवया, कुरळ केंस, चांफयाच्या कळीप्रमाणें नाक, कुंदकळ्याप्रमाणें दांत, कोमळ अंग, बिंबफळाप्रमाणें ओष्ठ, शंखाच्या आकाराचा कंठ, कृश शरीर, सूक्ष्म कटि ( कंबर ) शातोदरी (पातळ पोटाची) पृथु नितंब (कुल्ले) केळीच्या खांबाप्रमाणें मांड्या, भाग्यशालीन, कमलाप्रमाणें हस्तपाद, सुशील, सुगुणयुक्त, सुगंध, सत्कुलामध्यें उत्पन्न झालेली, लज्जाविनयसंपन्न, दयालु, धर्मपरायण, पतिसेवेविषयीं तत्पर अशी स्त्री असली तर तेथें लक्ष्मी प्रसन्न आहे असें समजावें, असली स्त्री लोकांस, व पितृकुळ, पतिकुळ यांस आनंदविते ॥ ६ ॥

**कनिष्ठिकांगुलिः पादे गच्छंत्या न स्पृशेद्भुवं ॥**
**निम्नं पादतलं जारा निःशब्दं भवति ध्रुवं ॥ ७ ॥**

**अर्थ**—पायाची किरांगुळी, व पाय जमिनीस संपूर्ण न लावतां चालणारी व चालतांना पायांचा शब्द होत असतो असली स्त्री खचित् जारिणी होईल ॥ ७ ॥

**अथवा विधवा भूयात्सुखं तस्या न विद्यते ॥**
**पादताडनतो भूमिं चालयंत्यपि खिद्यति ॥ ८ ॥**

**अर्थ**—आणखी तसली स्त्री विधवा होईल. चालतांना पाय आपटत चालते ती दरिद्र्याची बायको होऊन दुःख भोगील ॥ ८ ॥

**सरोमोत्तुंगजंघा च फालोत्तानातिमूर्धजा ॥**

**भुजोरुकेशयुक्ता च मस्तावर्ता पतिं हरेत् ॥ ९ ॥**

**अर्थ**—पायाच्या पिंडऱ्यावर केश (पुरुषाप्रमाणें) असणें, कपाळावर व मांडीवर व व भुजांवर केंस, तसेंच टाळूवर भोंवरा असला तर ती स्त्री विधवा होईल ॥ ९ ॥

**अत्यंतनीलकेशा च शुष्कश्रोणी च दासतां ॥**
**विकटांगुलिराप्नोति वैधव्यं चाप्यपुत्रतां ॥ १० ॥**

**अर्थ**—अतिशय काळे केंस, कृश नितंब असल्यास दास्यत्व पावते. वक्र अशीं हातांपायांचीं बोटें असतील तर वांझ आणि विधवा होईल ॥ १० ॥

**लंबालका महामस्ता पृथुमध्या महोदरी ॥**
**वामावर्ता च वैधव्यं दारिद्र्यं दुःखमाप्नुयात् ॥ ११ ॥**

**अर्थ**—लांब केंस, मोठें डोकें, लठ्ठ कंबर, मोठें पोट, वामभागीं भोंवरा असल्या लक्षणांनीं युक्त स्त्री वैधव्य, गरीबी, व दुःख पावते ॥ ११ ॥

**कट्यावर्ता सेवकस्त्री कंठावर्ता तु निष्प्रजा ॥**
**फालावर्ता च विधवा जारिणी कलहप्रिया ॥ १२ ॥**

**अर्थ**—कंबरेवर भोंवरा असल्यास सेवकस्त्री होते. कंठावर असल्यास संतान नाहीं. कपाळावर असल्यास जारिणी, कलहप्रिय व विधवा होईल ॥ १२ ॥

**ओष्ठचूबुकगंडेषु कर्णयोर्भुजयोरपि ॥**
**लोमानि न प्रकाशंते सा नारी भोगभोगिनी १३**

**अर्थ**—दाढी, मिशी, कान, बाहु, यांचेठायीं केंस किंचित्‌ही न दिसल्यास ती स्त्री फार सुखी होते १३

**नद्यावर्ताभनाभिश्च तनुरोमा सुरूपिणी ॥**
**सुदती सुमुखी भूयाद्राजपत्न्यतिकोमला ॥ १४ ॥**

**अर्थ**—नदीच्या भोंवऱ्याप्रमाणें उजव्या फेराची बोंबी, सूक्ष्म असे अंगावर रोम (लव) उत्तम रूपवान्, सुदती, कोमलांगी, सुमुखी अशी स्त्री राजपत्नी होईल ॥ १४ ॥

**समस्तनी च सौभाग्यं लभेच्छातोदरी सुखं ॥**
**स्थूलजंघा ऱ्हस्वफाला पुत्रपौत्रसुखं लभेत् ॥१५॥**

**अर्थ**—सम असे स्तन असणारी भाग्यवती, व सौभाग्यवती होईल. पातळ पोट, मोठ्या पिंडऱ्या, लहान कपाळ असली स्त्री पुत्रपौत्र पाहील व सुखी होईल ॥ १५ ॥

**तुंगकंठी तु निर्लज्जा ऱ्हस्वकंठी तु निर्धना ॥**
**कंबुकंठात्रिरेखाढ्या सुशीला कुलवर्धिनी ॥ १६ ॥**

**अर्थ**—मान उंच असणारी निर्लज्ज, फार आंखूड असल्यास निर्धन, शंखासारखी तीन रेखांसहित असल्यास चांगल्या स्वभावाची, व वंशवृद्धि करणारी होईल ॥ १६ ॥

**कंठे वा पार्श्वयोर्वापि तिलकाकृतिचिन्हका ॥**
**प्रथमप्रसवे पुत्रं प्राप्नुयान्नात्र संशयः ॥ १७ ॥**

**अर्थ**—मानेवर, बरगडींत अथवा कपाळावर तिलक असल्यास पहिल्या खेपेसच पुत्र प्रसवेल यांत संशय नाहीं ॥ १७ ॥

**दरस्मेरवती नारी तरलाक्षी च जारिणी ॥**
**प्रगल्भभाषिणी चैव लज्जा नटनशालिनी ॥१८॥**

**अर्थ**—किंचित् हास्य, चंचल नेत्र, शहाणपणाचें भाषण, अतिलज्जा, नट्ट पट्ट करणें, असली स्त्री जारिणी असते. ॥१८ ॥

**स्थूलोष्ठी स्थूलदंता च वृत्ताक्षी वक्रनासिका ॥**
**कक्षस्थनीलसिध्मा च भर्तुर्गृहविनाशिनी ॥ १९ ॥**

**अर्थ**—ओठ आणि दांत जाड, वाटोळे डोळे, वांकडें नाक, बगलेंत काळा मच्छ याप्रमाणें लक्षण असणारी स्त्री नवऱ्याच्या घराचा नाश करिते.॥१९॥

**पीतजिव्हा च वाचाटा खरीगंधा च निंदिता ॥**
**सर्वथैव परित्याज्या पांसुला सा भवेद्ध्रुवं ॥२०॥**

**अर्थ**—पिंवळी जीभ, विचकट भाषण, गाढवासारखा अंगाचा वास ती वाईट समजावी. अशा स्त्रीचा सर्व प्रकारें त्याग करावा, कारण जारिणी होईल.२०

**उष्णस्पर्शवती नारी रोदनं कुरुते मुहुः ॥**
**अक्षमा कलहोद्युक्ता ज्येष्ठालक्ष्मीसखी भवेत् २१**

**अर्थ**—अंग उष्ण असणें, वारंवार रडणें, शांतता न धरितां भांडणास उद्युक्त होणें, असली स्त्री लक्ष्मीच्या वडील बहिणीची सखीच ह्मणावयाची ह्मणजे अवदसा. ॥ २१ ॥

**कुमारीरसनीकाशस्वेदगंधवती तथा ॥**
**विलोमकेशी वक्राक्षी रिक्ता बहुसुताऽधवा॥२२॥**

**अर्थ**—कांटेशेवतीच्या फुलाप्रमाणें जिच्या घामाचा वास, विलोम केश, तिरवी नजर असली स्त्री

बहुत मुलें प्रसवून दरिद्रावस्था भोगून अखेर विधवा होईल. ॥ २२ ॥

**कुंदकुड्मलदंताभा ऱ्हस्वा नीलालकालिका ॥**
**निम्ननाभिश्च सुमुखी भर्तुः सौभाग्यदायिनी २३**

**अर्थ**—कुंदकळ्याप्रमाणें दांत, लहान कुरळे व नीलवर्ण केश, गंभीर नाभि, प्रसन्न मुख, अशी बायको नवऱ्याला सौभाग्य देते. ॥ २३ ॥

**वामपादावस्थितिस्तु मरिष्यति सुमंगली ॥**
**ऱ्हस्वकल्पापसव्यांघ्रिर्वैधव्यं लभते ध्रुवं ॥ २४ ॥**

**अर्थ**—उभी रहातांना डावा पाय टेकून उजवा पाय सैल सोडणारी स्त्री, पतीच्या आदि कुंकुमांकित मरेल. उजवा पाय टेकून डावा पाय सैल सोडणारी, व उजवा पाय किंचित् वांकडा असणारी विधवा होईल. ॥ २४ ॥

**मार्जारीस्वरसंयुक्ता निर्लज्जा रोषशालिनी ॥**
**मृतप्रजा भवेन्नारी मुहुश्चौर्यं करोति सा ॥ २५ ॥**

**अर्थ**—मांजरीच्या स्वराप्रमाणें स्वर, निर्लज्ज, रागीट असली स्त्री मृतप्रजायुक्त व चोरटी होईल॥२५॥

**मार्जारनेत्री कुनखी नासांतर्लोमसंकुला ॥**
**मुग्धा च गड्डयुक्तांगी अन्यैकोपकृतिं चरेत्॥२६॥**

**अर्थ**—मांजरासारखे डोळे, वाईट नखें, नाकांत केस, मूर्खत्व, गांठळ आंग ह्यांनीं युक्त स्त्री "घराला मारी व लोकांना उपकारी" या ह्मणीप्रमाणें होईल ॥ २६ ॥

दुःशीला कर्कशा चंडी नित्यं कलहकारिणी ॥
अतिभुंक्ते च या नारी सप्रजामपि तां त्यजेत्२७

अर्थ—दुःस्वभाव, कर्कशा, मोंड कलह करणारी, खादाड, अशी स्त्री पुत्रवती असली तरी सोडावी॥२७॥

भीरुः स्वप्नोन्मादवती रक्षोगणसमुद्भवा ॥
शुष्काक्षिकुक्षिकंठा च प्रस्विन्नचरणा तथा ॥२८॥
दारिद्र्यं च दुराचारं वंध्यात्वं बहुमैथुनं ॥
लभते च स्तनस्थौल्ये बह्वाचारं च संततिं ॥२९॥

अर्थ—भिणें, स्वप्नांत उन्माद करणारी, राक्षसगणनक्षत्रावर जनन, लहान डोळे, बारीक मान, लहान कुशी, तळपायांस घाम; असली बायको गरीब, दुराचारी, वांझ, बहुमैथुनी होते; परंतु असलीस स्तन मात्र मोठ असतील तर संतति व सदाचार हे गुण असतात ॥ २९ ॥

प्रसन्नवक्त्रा मुग्धाक्षी दैवन्यस्तभरा तथा ॥
कूर्मपृष्ठप्रपदका तीर्थयात्राफलं लभेत् ॥ ३० ॥

अर्थ—प्रसन्न मुख, सुंदर नेत्र, देवभक्ति, कांसवाच्या पाठीप्रमाणें पुढले पाय येणेंकरून युक्त जी, ती तीर्थयात्रा फल पावते ॥ ३० ॥

अभुक्तमूलसंभूता वामोर्वतास्तिलद्वयी ॥
लभते नीचसंसर्गं गृहं त्यक्त्वा बहिर्व्रजेत् ॥३१॥

अर्थ—मूलनक्षत्राच्या अभुक्तांशांत जन्मलेली, डाव्या मांडीवर दोन तिळाच्या आकृति, या प्रकारची बायको असेल तर ती नीचाशीं संबंध करून

घराचा नाश करून बाहेर उठून जाईल ॥ ३१ ॥

**सूक्ष्मबिंबारुणोष्ठी च निजकांतानुरागिणी ॥**
**समांगुलिर्ऱ्हस्वकरा गुरुशुश्रूषणे रता ॥ ३२ ॥**

**अर्थ**—तोंडल्यासारखे तांबडे ओंठाची स्त्री असल्यास आपल्या नवऱ्यापासून प्रीति पावते. चांगल्या बोटांची लहान हाताची असल्यास सासू सासरा आदिकरून वडिलांची सेवा करिते ॥ ३२ ॥

**दीर्घपृष्ठा भ्रातृहानिं वैशाल्ये बहुसोदरान् ॥**
**लभते तनुमध्या च सुंदरी बहुभूषणं ॥ ३३ ॥**

**अर्थ**—पाठ लांब असल्यास बंधुनाश, रुंद असल्यास पुष्कळ बंधु असतील. लहान कंबर असून बांधेसूद असल्यास बहुत अलंकार घालील ॥ ३३ ॥

**मृदुकर्णा रत्नभूषां सौवर्णं कठिनश्रुतिः ॥**
**कंकणं शुष्कहस्ता च व्यासोरूर्हारभूषणं ॥ ३४ ॥**
**तस्या एव कुरूपत्वे नैल्ये वा वामचक्षुषः ॥**
**ऱ्हस्वत्वे प्राप्नुयादेव स्वाकल्पं रत्नसंयुतं ॥ ३५ ॥**

**अर्थ**—कान मऊ असल्यास रत्नभूषणें मिळतील, टणक असतील तर सोन्याचे दागिने मिळतील, लहान हात असतील तर कंकणादि आभरणें मिळतील. छाती रुंद असल्यास कंठाभरणें मिळतील. याच्या विपरीत लक्षणें असलीं तरी कुरूप, काळसर, डावा डोळा लहानसर अशी असली तरी चांगलीं रत्नादि आभरणें घालील ॥ ३५ ॥

**ऱ्हस्वत्वं दक्षिणांगस्य भविता कीर्तिशालिनी ॥**

**वामांगस्य तु दुष्कीर्तिं प्राप्नुयात्पुंश्चली भवेत् ३६**

**अर्थ**—स्त्रीच्या शरीराचा उजवेकडील कोणताही भाग डावेकडील अंगाच्या भागांपेक्षां लहान असल्यास कीर्तिमान होईल. डावेकडील भाग लहान असला तर दुष्कीर्ति संपादील व पुरुषाप्रमाणें धीट होईल ३६

**स्वांगुलिश्चलकोपेता दीर्घजिव्हा लभेत्पशून् ॥**
**सव्यनासातिलवती धनधान्यादिकं लभेत् ॥३७॥**

**अर्थ**—अंगठा व तर्जनी सुरेख, तळहात डौलदार, जीभ किंचित् लांब अशी स्त्री पुष्कळ पशु संपादील. तसेंच डाव्या नाकपुडीवर तीळ असल्यास धनधान्यातें पावेल ॥ ३७ ॥

**वामांघ्रिमध्यमांगुल्यामधोरेखाद्वयं यदि ॥**
**वाहनं लभते नारी गेहं च रुचिरं तथा ॥ ३८ ॥**

**अर्थ**—डाव्या पायाच्या मधल्या बोटाच्या खालच्या बाजूस जुळ्या रेखा सरळ असल्यास तसली स्त्री वाहन व चांगलें घरही संपादिते ॥ ३८ ॥

**पद्मगंधवती नारी भगवद्भक्तिमाप्नुयात् ॥**
**दुर्लक्षणवती दुष्टा शोभनैव सुलक्षणा ॥ ३९ ॥**

**अर्थ**—कमळाप्रमाणें सुवास असणारी स्त्री भगवद्भक्ति करील. वाईट लक्षणाची वाईट होते. सुलक्षणें असणारी शुभवती होते ॥ ३९ ॥

**शुष्कावूरू तथा बाहू सरोमौ चेत्पतिं हरेत् ॥**
**शुष्कयोनिश्च विरलद्विजा त्याज्या मनीषिभिः ४०**

**अर्थ**—मांड्या आणि बाहु बारीक असून केसाळ

असल्याम नवऱ्यास मारील. योनि शुष्क असून .वि-
रळ दांत असल्यास तिचा त्याग करावा ॥ ४० ॥

**कन्यां प्रथमतो द्रष्टुं पुरुषो यदि गच्छति ॥**
**तदा भुंक्ते यदि रुजं रुदती भर्तृनाशनं ॥ ४१ ॥**
**निद्रालुर्दीर्घनिद्रां च गछंत्यपि च जारिणी ॥**
**सर्वान्निष्कासयेद्गेहात्करोति कलहं यदि ॥ ४२ ॥**
**अपस्मृतिर्दुःखयुक्ता वस्त्रहीना वियोगिनी ॥**
**अंधकारे महामूढा सालंकारा च मंगलं ॥ ४३ ॥**
**प्रकाशेपि तु सत्कीर्तिं भोजने सुप्रजां लभेत् ॥**
**पुष्पिणी लभते मृत्युं जारिणी वा विरागिणी४४**

**अर्थ**—जेव्हां पुरुष प्रथम कन्या पहाण्यास जा-
तो त्या वेळीं ती कन्या तेलानें माखली असल्यास
रोगी होईल. रडत असल्यास नवरा मरेल. निजली
असल्यास तीच मरेल. बाहेर जात असल्यास जा-
रिणी होईल. भांडत असल्यास घर लुटून घरांतील
मंडळीस बाहेर घालवील. अंगावर स्मृति असल्यास
दुःख भोगील. नागवी असल्यास नवऱ्याचा त्याग
करील. अंधारांत असणारी अज्ञानी होईल उजेडांत
असल्यास सत्कीर्तियुक्त होईल. अलंकारांसह अस-
ल्यास मंगलकारक होईल. जेवणारी पुत्रवती होईल.
विटाळशी असल्यास मृत्यु पावेल. कदाचित् वांचल्या-
स व्यभिचारी होईल, अथवा विरक्त होऊन संसारा-
चा त्याग करील ॥ ४४ ॥

**या देवगणनक्षत्रशुभवारसमुद्भवा ॥**

ऱ्हस्वजिव्हासमायुक्ता विद्यावृद्धिमवाप्नुयात् ४५

अर्थ—देवगण नक्षत्र, शुभवार यांचेठायीं उत्पन्न झालेली, व जीभ लहान असल्यास विद्यावृद्धि संपादील ॥ ४५ ॥

इति सामान्यतः प्रोक्तं स्त्रीसामुद्रिकलक्षणं ॥
विशेषलक्षणैस्तत्तन्मेलयेच्च यथाबलं ॥ ४६ ॥

अर्थ—याप्रकारें करून स्त्रीसामुद्रिक लक्षण सांगितलें. विशेष लक्षण वचनबलानुसार याच्याशीं मेळ घालून सांगावें.

इति प्रऱ्हादप्रणीत स्त्रीसामुद्रिकं समाप्तं.

## अथ हरगौरीसामुद्रिकारंभः

---

### श्रीमहादेव उवाच.

अथातः संप्रवक्ष्यामि हस्तरेखाविचारकं ॥
दक्षिणः पौरुषो ज्ञेयो वामो वामकरः शुभः॥१॥

अर्थ—महादेव पार्वतीस म्हणतात कीं, आतां तुला हस्तरेखाविचार सांगतों. त्यांत पुरुषाचा उजवा हात व स्त्रियांचा डावा हात शुभ जाणावा ॥ १ ॥

यस्य मीनसमा रेखा कर्मसिध्दिश्च जायते ॥
धनाढ्यः स तु विज्ञेयो बहुपुत्रो न संशयः ॥ २ ॥

**अर्थ**—ज्या मनुष्याच्या हातावर मत्स्यासारखी रेखा असते तो मनुष्य पुण्यकर्मामध्यें सिद्धि पावतो. आणि धनवान् व पुत्रवान् होतो यांत संशय नाहीं॥२॥

**तुला ग्रामस्तथा रज्जुः करमध्ये च दृश्यते ॥**
**तस्य वाणिज्यसिध्दिः स्यात्पुरुषस्य न संशयः॥३॥**

**अर्थ**—ज्या मनुष्याच्या हातावर, तागडी, ग्रामरेखा, दोरीच्या आकाराची रेखा ह्या असतात तो मनुष्य व्यापाराच्या योगानें धनिक होतो ॥ ३ ॥

**पद्म चापादिकं खड्गमष्टकोणादि दृश्यते ॥**
**स्त्रियाश्च पुरुषस्यापि धनवान् स सुखी नरः ॥४॥**

**अर्थ**—कमळाकाररेखा, धनुष्याकाररेखा, खड्ग, अष्टकोण, षट्कोण, त्रिकोण आदिकरून रेखा स्त्रियांस किंवा पुरुषांस हातावर दिसल्या तर तीं धनवान् आणि सुखी असतात ॥ ४ ॥

**शंखचक्रध्वजाकारो माषाकारश्च दृश्यते ॥**
**सर्वविद्याप्रवीणश्च बुद्धिमान् स भवेद्ध्रुवं ॥ ५ ॥**

**अर्थ**—शंखाकार, चक्राकार, ध्वजाकार, ( पताका ) माषाकार ( उडीदाप्रमाणें ) याप्रमाणें ज्याच्या हातावर चिन्हें असतात तो सर्वविद्येंत निपुण होऊन प्रमुखता पावतो. बुद्धिमान् होतो. 'विशेषविचार' शंख असल्यास ज्योतिषी होईल. चक्र असल्यास तर्कशास्त्रज्ञ होईल. ध्वज असेल तर वेदविद्यापारंगत होईल. माष असल्यास संसारसंबंधीं व्यापारविद्याप्रवीण होईल. सर्व चिन्हें असतील तर वेदविद्या, वेदांग, पुराणविद्या, कवित्व, सभापूज्यत्व, महदैश्वर्यवान्

व सुखी होईल. अथवा राजवंशीं किंवा तत्सदृशवंशांत जन्मून सुख पावेल ॥ ५ ॥

त्रिशूलं करमध्ये तु तेन राजा भविष्यति ॥
यज्ञे धर्मे च दाने च द्विजदेवप्रपूजने ॥
निरतः पुत्रवांश्चैव प्रतिष्ठाता शिवस्य च ॥ ६ ॥

अर्थ—हातामध्यें त्रिशूलरेखा असेल तर याजक, धार्मिक, दाता, देवब्राह्मणपूजासक्त, पुरुषप्रजावान् , ईश्वरप्रतिष्ठा करणारा असा राजा होईल. स्त्रीस असेल तर पट्टराणी होईल. त्रिशूलरेखा मलीन असेल तर प्रभूचा आश्रय करून सुखानें उपजीविका करील

शक्तितोमरबाणं च करमध्ये तु दृश्यते ॥
रथचक्रध्वजाकारः स च राज्यं लभेन्नरः ॥ ७ ॥

अर्थ—ज्याच्या हातांत शक्ति ( एक हत्यार ) तोमर, ( पट्टा ) बाण, रथचक्र, ध्वज, ( बावटा ) हीं चिन्हें असतात तो देशाधिपत्य पावेल ॥ ७ ॥

अंकुशं कुंडलं चक्रं यस्य पाणितले भवेत् ॥
तस्य राज्यं महच्छ्रेष्ठं सामुद्रवचनं तथा ॥ ८ ॥

अर्थ—ज्याच्या हातांत अंकुश, कुंडल, चक्र, हीं चिन्हें असतात. त्यास उत्तम राज्यपद प्राप्त होतें. असें श्रीविष्णूचें वचन आहे. एकच चिन्ह असेल तर सामान्य राजा होईल. दोन चिन्हें असल्यास राजधनमूलक ऐश्वर्य प्राप्त होतें ॥ ८ ॥

गिरिकंकणयोनीनां नरमुंडकरीरयोः ॥
करिणां यस्य चिन्हानि राजमंत्री भवेन्नरः ॥९॥

**अर्थ**—ज्या मनुष्याच्या हातांत पर्वत, कंकण, मनुष्यरुंड, योनि, घट, गज, हीं सहा चिन्हें असता-त तो राजमंत्री होतो. याहून कमी असल्यास एखा-द्या थोर मनुष्याचा आश्रय करून त्याच्या अनुमतानें राहील ॥ ९ ॥

**सूर्यचंद्रलतानेत्रैरष्टकोणत्रिकोणकैः ॥**
**गजाश्वमंदिरैर्भूयात्धनी चापि सुखी नरः १०**

**अर्थ**—मनुष्याच्या हातांत सूर्य, चंद्र, लता, ने-त्र, अष्टकोण, त्रिकोण, गज, अश्व, मंदीर हीं चिन्हें असल्यास धनवान् आणि सुखी होईल. ज्या ज्या प्र-कारचें चिन्ह असेल त्याच्या त्याच्या पोषणेंकरून उपजीविका होते ॥ १० ॥

**अनामिकापर्वमूले कनिष्ठादिक्रमेण तु ॥**
**आयुर्दशैव वर्षाणि सामुद्रवचनं तथा ॥११॥**

**अर्थ**—ज्याच्या हातांत करांगुळीच्या मुळाच्या खालच्या बाजूपासून आयुष्यरेखा उत्पन्न होऊन अ-नामिकेच्या मुळापर्यंत असल्यास त्यास दहा वर्षें आयुष्य असतें असें विष्णूचें वचन आहे. ॥ ११ ॥

**तर्जनीमूलपर्याप्तं कनिष्ठादि क्रमेण तत् ॥**
**आयुश्चविंशतेः षट्कं रक्तरेखा च दृश्यते ॥ १२ ॥**

**अर्थ**—जी आयुष्यरेखा कनिष्ठिकेपासून क्रमानें तर्जनीच्या मुळापर्यंत गेलेली असते व तांबूस असते ती १२० वर्षें आयुष्य दर्शविते ॥ १२ ॥

**यदा रेखांतरैर्भिन्ना स्वयंभिन्ना च दृश्यते ॥**

तदा सम्यग्विजानीयात् गंडकालं विशेषतः॥१३॥

अर्थ—जेव्हां ही आयुष्यरेखा स्वतः छिन्न झालेली असते व आडव्या रेखांनीं मिळाली असते तेव्हां ते भाग हिशेबानें गंडांतराचे जाणावे ॥ १३ ॥

सा नम्रा चेदधोभागे कनिष्ठादिक्रमेण तु ॥
वृक्षादुन्नतदेशाद्वा वाहनात्पतनं भवेत् ॥ १४ ॥

अर्थ—आयुष्यरेखा कनिष्ठिकादिक्रमापासून खालच्या प्रदेशास वाकली असल्यास झाडावरून अथवा उंचप्रदेशावरून अथवा अश्वादिवाहनावरून खालीं पडेल ॥ १४ ॥

अंगुष्ठे चोर्ध्वरेखा तु वर्तते नृपतिः शुभा ॥
सेनापतिर्धनेशश्च मध्यमायुर्भवेन्नरः ॥ १५ ॥

अर्थ—अंगठ्यांत शुभकर अशी ऊर्ध्वरेखा असणारा मनुष्य राजा झाल्यास किंवा सेनापति किंवा धनिक झाल्यास होईल, परंतु मध्यमायुषी होईल॥१५॥

तर्जनीमूलपर्यंतमूर्ध्वरेखा च दृश्यते ॥
राजदूतो भवेत्तस्य धर्मनाशश्च जायते ॥ १६ ॥

अर्थ—तर्जनीमूळापर्यंत ऊर्ध्वरेखा असल्यास तो मनुष्य राजसेवक होईल. त्याचा धर्मनाश होईल १६

मध्यमामूलपर्यंतमूर्ध्वरेखा च दृश्यते ॥
पुत्रपौत्रादिसंपन्नो धनवान् स सुखी नरः १७

अर्थ—मधल्या बोटापर्यंत ऊर्ध्वरेखा असल्यास तो मनुष्य पुत्रपौत्रादिसंपन्न व धनवान् व सुखी होतो.

अनामिकोर्ध्वरेखायां व्यवसायो धनागमः ॥

**सुखदुःखेन जीवेत पुत्रपौत्रगृहादिषु ॥ १८ ॥**

**अर्थ**—तळहातांत लांब रेखा अनामिकेच्या बुडापर्यंत गेली असल्यास तसल्या मनुष्याला उद्योगव्यापारापासून धनप्राप्ति होईल. त्यास संसारांत सुखदुःखें समान असतात ॥ १८ ॥

**येषां पाणावूर्ध्वरेखा कनिष्ठामूलसंस्थिता ॥**
**ते नराः परदेशेषु शतमायुर्भजंति वै ॥ १९ ॥**

**अर्थ**—ज्या मनुष्यांच्या तळहातांत करांगुळीच्या बुडास पोंचे अशी लांब रेखा असते ते परस्थळीं दीर्घायु होऊन राहतात ॥ १९ ॥

**आयुर्बले भवेद्रेखा मध्यमामूलसंस्थिता ॥**
**पंचसप्ततिवर्षाणि ह्यायुषो बलमुच्यते ॥ २० ॥**

**अर्थ**—आयुष्यरेखा मधल्या बोटाच्या बुडापर्यंत आली असल्यास ७९ वर्षें आयुष्य म्हणून सांगावें२०

**मध्यमामूलपर्यंतमायुरेखा न दृश्यते ॥**
**चतुर्दशचतुर्विंशदायुर्बलविनाशनं ॥ २१ ॥**

**अर्थ**—आयुष्यरेखा मधल्या बोटापर्यंत न दिसल्यास चवदा किंवा चोवीस वर्षांच्या आयुष्यांत कमी होईल. म्हणजे मागें सांगितल्या ७९ वर्षांच्या आयुष्यांत १४।२४ कमी झाले तर ५१।६१ वर्षें आयुष्य म्हणून समजावें ॥ २१ ॥

**आयुर्बले भवेद्रेखानामिकामूलसंस्थिता ॥**
**त्रिदशं च त्रिषष्टिश्च आयुर्बलविनाशनं ॥ २२ ॥**

**अर्थ**—आयुष्यरेखा अनामिकेच्या बुडापर्यंत आली असल्यास ६३ किंवा ३०वर्षांपर्यंत आयुष्य असतें.

**अंगुलीनां पृथक् रेखा गण्यते त्रितयं पृथक् ॥**
**रेखाद्वादशकं सौख्यधनधान्यप्रयादकं ॥ २३ ॥**

**अर्थ**—बोटांवर असणाऱ्या रेखा एकेका तीन तीन अशा एकंदर १२ रेखा असल्या तर सौख्य, धन-धान्याप्रत देतात ॥ २३ ॥

**अंगुलीनां पृथक्रेखा कलने चेत्त्रयोदश ॥**
**महादुःखं महाक्लेशः सामुद्रवचनं तथा ॥ २४ ॥**

**अर्थ**—बोटांच्या सर्व रेषा मिळवाऱ्या, जर तेरा भरतील तर मोठें दुःख व मोठे क्लेश प्राप्त होतील असें विष्णूचें वचन आहे ॥ २४ ॥

**अंगुलीनां पृथक् रेखागणने चेच्चतुर्दश ॥**
**महासुखी महाभोगी सामुद्रवचनं तथा ॥ २५ ॥**

**अर्थ**—बोटांच्या निरनिराळ्या रेखा मिळविल्या असतां १४ होतील तर बहुत सुखी व बहुत भोगी होईल. असें सामुद्राचें वचन आहे. ॥ २५ ॥

**रेखापंचदशे चोरः षोडशे द्यूतवंचकः ॥**
**पापी सप्तदशे ज्ञेयो धर्मात्माऽष्टादशे भवेत् ॥२६॥**

**अर्थ**—बोटांच्या रेखांची बेरीज १५ झाली तर चोर, १६ झाली तर द्यूत खेळणारा तसाच वंचक, १७ झाल्यास पापी, १८ झाल्यास धार्मिक होईल २६

**ऊनविंशे भवेन्मान्यो गुणज्ञो लोकपूजितः ॥**
**तपस्वी विंशता ज्ञेयो महात्मा चैकविंशता ॥२७॥**

**अर्थ**—पांची बोटांच्या मिळून १९ रेषा झाल्या तर गुणज्ञ, लोकमान्य होतो. २० असल्यास तपस्वी

होतो. २१ असल्यास महात्मा जाणावा. ॥ २७ ॥

**अंगुलीनां पर्वमध्यें सांगुष्ठं चाग्रपर्व च ॥**
**परित्यज्यांगुलीपर्व रेखागणनतो यतः ॥ २८ ॥**
**चतुरंगुलिकापर्वाण्यष्टरेखायुतानि चेत् ॥**
**शुभयोगयुतो भूयात्धनवांश्च भविष्यति ॥ २९ ॥**

**अर्थ**—बोटांचीं पेरें अंगठ्यापासून इतर बोटांचीं शेवटचीं पेरें सोडून बोटांच्या पेऱ्यांच्या मध्यें असणाऱ्या रेखांची बेरीज ( चार बोटांचीं ) ३२ होत असलीं तर ( प्रत्येक पेरास ४ याप्रमाणें चार बोटांचीं आठ पेरें मिळून ) शुभदायक, सुखानुभव घेणारा द्रव्यवान् होईल ॥२८॥ २९ ॥

**तत्रैकविंशतिः स्याच्च दुःखवांश्च भविष्यति ॥**
**त्रयस्त्रिंशच्च षट्त्रिंशत्धनलक्ष्मीसहाय्यवान् ॥३०॥**

**अर्थ**—अंगठा आणि इतर बोटांचीं शेवटें हीं सोडून चारी बोटांच्या इतर पेरांत २१ रेघा असल्यास शोकयुक्त होतो. ३३ किंवा ३६ रेघा असल्यास द्रव्य संपादण्यास सहाय्यकारक होतात ॥ ३०

**एकचक्रः सदाभोगी द्विचक्रो राजपूजितः ॥**
**धनाढ्यस्तु त्रिभिश्चक्रैश्चतुश्चक्रो दरिद्रकः ॥३१॥**

**अर्थ**—एक चक्र असणारा सदा सुखोपभोगी होतो. दोन चक्रें असणारा राजपूजित होतो. ह्मणजे राजापासून सन्मान पावतो. तीन चक्रें असणारा धनवान् होतो. व चार चक्रें असणारा दरिद्रि होतो ३१

**विलासी पंचचक्रेण षट्चक्रेण सकामुकः ॥**

सप्तचक्रेण शुभवान् अष्टचक्रेण रोगवान् ॥ ३२ ॥
भूपालो नवचक्रेण दशचक्रेण योगवान् ॥
एवं चक्रफलं दृश्यं सामुद्रवचनं तथा ॥ ३३ ॥

अर्थ—पांच चक्रांचा विलासी, सहा चक्रांचा कामी, सात चक्रांचा शुभवान्, आठ चक्रांचा रोगी, नऊ चक्राचा भूपति, ( राजा ) दहा चक्राचा योगी, याप्रमाणें चक्रावरून प्राप्त होणारें कारण समजून घ्यावें. असें विष्णूचें वचन आहे ॥३२॥३३॥

एकशंखः सुखी भोगी द्विशंखेन दरिद्रता ॥
चतुःशंखेन गुणवान् त्रिशंखेनागुणी भवेत् ॥३४॥
निर्धनः पंचशंखः स्यात् षट्शंखेन प्रतापवान् ॥
सप्तादिदशशंखांतं राजचिन्हानि दृश्यते ॥३५॥

अर्थ—दोनी हातांत एक शंख असल्यास सुखी, दोन शंखांचा दरिद्रि, तीन शंखाचा निर्गुण, चार शंखांचा गुणवान्, पांच शंखांचा निर्धन, सहा शंखांचा प्रतापी, ७।८।९।१० शंखाचें राजलक्षण जाणावें.

एकशीपेन गुणवान् वक्ता भूयाद्विशीपतः ॥
धनाढ्यस्तु त्रिशीपेन चतुः शीपेन सद्गुणी ॥३६॥
चतुः शीपादिदशकशीपांते वृद्धिमान् भवेत् ॥

अर्थ—एक शीप असल्यास गुणी, दोन असल्यास वक्ता, तिनींस धनाढ्य, चारींस सद्गुणी, आणि चारींपासून दहांपर्यंत याचप्रमाणें वृद्धि समजावी. शीप ह्मणजे नंदीच्या पाठीवर शिंपीसारखी खूण असते ती ॥ ३६ ॥

**रेखैका मणिबंधे तु राजभोगी भवेन्नरः ॥**
**यदि द्वे सगुणी वक्ता धनवांश्च भविष्यति ॥३७॥**

**अर्थ**—मणगटावर एक रेखा असलेला मनुष्य राजभोग भोगतो. दोन असणारा गुणवान्, वक्ता आणि धनवान् होतो. ॥ ३७ ॥

## अथ ललाटवर्णनं.

**उन्नतैर्विपुलैः शंखैर्ललाटैर्विषमैस्तथा ॥**
**निर्धनो धनवंतश्च अर्धेंदुसदृशो नरः ॥ ३८ ॥**

**अर्थ**—ज्याचें ललाट ( कपाळ ) उंच असून त्यावर उन्नत शंख चिन्ह दृष्टीस पडेल, अथवा अर्ध चंद्राप्रमाणें रेषा असतील, तो पुरुष निर्धन असला तरी भाग्यवान् होईल ॥३८॥

**आचार्याः शुक्तिविशालैः शिरालैः पापकारिणः॥**
**उन्नताभिः शिराभिस्तु स्वस्तिकाभिर्धनेश्वरः ३९**

**अर्थ**—ज्याच्या ललाटावर शिंपीसारख्या शिरा असतील तो आचार्य साधु होईल; केवळ शिराच असतील तर पापाचरण करणारा अधम होईल; व शिरा उंच असून स्वस्तिकाकार दिसत असतील तर मोठा धनवान् होईल असें समजावें. ॥ ३९ ॥

**निम्नैर्ललाटैर्वधार्हः क्ररकर्मरतस्तथा ॥**
**संवृतैश्च ललाटैस्तु कृपणा उन्नतैर्नृपाः॥ ४० ॥**

**अर्थ**—ज्या पुरुषाचे कपाळाचे मध्यभागीं खळगा असेल तो निम्न ललाट ह्मणावा. तो क्रूरकर्म करणारा अतएव वध्य होय. ज्याचें आकुंचित असेल तो

रण, ज्याचें उन्नत व विस्तीर्ण असेल तर राजा
होईल असें जाणावें. ॥ ४० ॥

ललाटोपसृताभिस्त्रिरेखाभिः शतवर्षिणं ॥
नृपत्वं स्याच्च शताभिरायुः पंचनवत्यथ ॥ ४१ ॥

**अर्थ**—ज्या मनुष्याचे कपाळावर तीन रेखा स्पष्ट दिसत असतील तर तो शंभर वर्षेपर्यंत वांचेल. आणि शंभर रेखा असतील तर राजा होऊन ९५ वर्षेपर्यंत राज्य करील. ॥ ४१ ॥

अरेखेणायुर्नवति विच्छिन्नाभिश्च पुंश्चलः ॥
केशांतोपगताभिश्च आशीत्यायुर्नरो भवेत् ॥४२॥

**अर्थ**—ज्याचे ललाटावर रेषा नसतील तो नव्वद वर्षें वांचेल. रेषा असून छिन्न भिन्न झाल्या असतील तर परस्त्रीरत; रेषा केशांपर्यंत सारख्या मिळाल्या असल्यास ८० वर्षें आयुष्य समजावें ॥ ४२ ॥

पंचभिः पंचभिः षड्भिः पंचाशद्बहुभिस्तथा ॥
चत्वारिंशच्च वक्राभिस्त्रिंशद्भ्रूलग्नगामिभिः ४३

**अर्थ**—ज्याच्या कपाळावर वांकड्या तिकड्या दहा रेषा असतील तो चाळीस वर्षें वांचेल. त्याप्रमाणेंच जर ललाटावर वांकडी भ्रुकुटीच्यावर एक रेषा दिसेल तर तो तीस वर्षेपर्यंत जगेल ॥ ४३ ॥

विंशतिर्वामवक्राभिरायुः क्षुद्राभिरल्पकं ॥
न पृथुबालेंदुनिभे भ्रूवौ चाल्पललाटके ॥ ४४ ॥

**अर्थ**—ज्याच्या कपाळावर डाव्या बाजूस अधिक रेषा असतील किंवा लहान लहान व वांकड्या

तिकज्या रेषा दिसतील तो वीस वर्षे मात्र वांचेल. भ्रुकुटीच्यावर रेषा फार नसून द्वितीयेच्या बालेंदुप्रमाणें रेषाचिन्ह दृष्टीस पडेल, किंवा रेषा अति अल्प व सूक्ष्म असतील तर तो प्राणी अल्पायु आहे असें जाणावें ॥ ४४ ॥

शुभमर्धेंदुसंस्थानमत्युच्चं स्यादलोमशं ॥
नृपतीनां भवेच्चिन्हं ललाटे शुभदर्शनम् ॥ ४५ ॥

**अर्थ**—ज्याच्या उच्च ललाटाच्या मध्यें व भ्रुकुटीच्यावर अत्युन्नत अर्धचंद्राकार रेषा रोमरहित स्पष्ट दिसत असेल, व भ्रुकुटीचे केस एकमेकांस मिळालेले न दिसतील, तर तो मनुष्य राज्यवैभव भोगील असें स्पष्ट चिन्ह आहे असें जाणावें ॥ ४५ ॥

इति गारुडे ललाटशुभाशुभवर्णनं समाप्तम् ।

## अथ कक्षालक्षणम्.



कक्षाऽश्वत्थदला श्रेष्ठा सुगंधिन्यूर्ध्वरोमिका ॥
अन्यथार्थविहीनानामसौ निःस्वस्य चारके ४६

**अर्थ**—पिंपळाच्या पानाप्रमाणें दिसणारी कक्षा स्त्रीची किंवा पुरुषाची श्रेष्ठ समजावी. कक्षा पिंपळाच्या पानाप्रमाणें असून सुगंधयुक्त व चढत्या केंसाची असेल तर मोठें फल देणारी व श्रेष्ठ समजावी. तशी

कक्षा असल्यास अन्न, धन, कीर्ति, पुत्र, पौत्र इत्यादिकांची वाण असणार नाहीं. पण दुर्गंध असेल तर ती अशुभ लक्षणें जाणावीं. हें निराळें सांगण्यास नको ॥ ४६ ॥

इति गारुडे कक्षालक्षणं समाप्तम्।

---

## अथ नासिकाकंठलक्षणम्.

---

आतां नासिका व कंठाचें लक्षण सांगतों.

**वंशवेतसपत्राभो गजरोमोच्चनासिकः ॥**
**विकटः कुटिलाकारो लंबगल्लस्तथा शुभः ॥४७॥**

**अर्थ**—वेळूच्या किंवा वेताच्या पानासारखा वर्ण अथवा हत्तीच्या केशांसारखा वर्ण असून किंचित् वक्र व नाकाच्या पुढ्या लांब असल्यास शुभ होय ४७

### अथ भुजालक्षणं.

**निर्मांसौ चैव भग्नचाल्यौ श्लिष्टौ च विपुलौ भुजौ॥**
**आजानुलंबिनैर्बाहुवृत्तौ पीनौ नृपेश्वरे ॥ ४८ ॥**

**अर्थ**—बाहू विशेष मांसल नाहींत परंतु गुडघ्यांपर्यंत लांब असून वर्तुळ व सारखे असल्यास त्यास अजानुलंब ह्मणतात. असे बाहु बहुधा राजाचे असतात. ॥ ४८ ॥

**निःस्वानां रोमशौ ऱ्हस्वौ भुजौ दारिद्रदायकौ ॥**

आरोमशौ तु सुखिनौ श्रेष्ठौ करिकरप्रभौ ॥४९॥

**अर्थ**—दरिद्री लोकांचे बाहू आंखुड असून बहुत केसांनीं व्याप्त असतात. हत्तीच्या सोंडेसारखे सरळ असून विरळ केस असतील तर तो पुरुष सुख भोगील असें जाणावें ॥ ४९ ॥

## अथ जंघालक्षणं.

अल्परोमयुताः श्रेष्ठा जंघा हस्तिकरोपमा ॥
रोमैकैकं कूपके स्यात् नृपाणां तु महात्मनां ५०

**अर्थ**—ज्याच्या जंघा ( मांड्या ) हत्तीच्या शुंडादंडाप्रमाणें सरळ गोल असून प्रत्येक कूपामध्यें एकेक केश असेल तर श्रेष्ठ होय व बहुधा हें चिन्ह महान राजाचें असतें. ॥ ५० ॥

रोमत्रयं दरिद्राणां रोगी निर्मांस जानुकः ॥
महादारिद्र्यजं दुःखं भुंक्ते रोमचतुर्थकं ॥ ५१ ॥

**अर्थ**—प्रत्येक छिद्रांत तीन तीन केश असतील तर दरिद्री. मांसरहित मांड्या असतील तर दुःखी व रोगी होईल. आणि चार चार केश असतील तर महा दरिद्री व दुःख भोगणारा होईल ॥ ५१ ॥

## अथ मुखवर्णनं.

आरक्तावधरौ श्रेष्ठौ मांसलं वर्तुलं मुखं ॥
कुंदपुष्पसमादंता भाषितं कोकिलासमं ॥ ५२ ॥

**अर्थ**—ज्या मनुष्याचा खालचा ओंठ लाल, मुख मांसल, वाटोळें, कुंदपुष्पाप्रमाणें दांत, व कोकिळेसारखा स्वर असेल तर तो सुखी व श्रेष्ठ होईल॥५२॥

**दाक्षिण्ययुक्तशमठं हंसशब्दसुखावहं ॥**
**नासा समा समपुटा स्त्रीणां तु रुचिरा शुभा ५३**

**अर्थ**—ज्याच्या मुखावर दक्षतेचें चिन्ह स्पष्ट दिसेल व ज्याची मुद्रा प्रेमळ दिसेल, व हंसाप्रमाणें मधुर शब्द असेल, व नाकपुड्या सम असून उच्च अरुणवर्ण असतील तर हीं लक्षणें सुंदरपणाचीं व शुभ समजावीं ॥ ५३ ॥

**नीलोत्पलनिभंचक्षुर्नासालग्नौ न लंबकौ ॥**
**न पृथुर्बालेंदुनिभौ भ्रूवौ चाथ ललाटके ॥ ५४ ॥**

**अर्थ**—ज्याचे डोळे नीलकमलाप्रमाणें असून नासापुटापासून कर्णासमोर गेले असूनही बेट बन भासणारे त्यास आकर्णनयन म्हणावें. अशा नेत्रांचा किंचित् अरुणवर्ण असून द्वितीयेच्या चंद्राप्रमाणें भिवया व त्याही फार बारीक नाहींत व मोठ्या नाहींत अशा सुरेख असतील तर तो प्राणी फार सुख भोगणारा होईल ॥ ५४ ॥

**शुभमर्धेंदुसंस्थानमत्युच्चं स्यादलोमशं ॥**
**अनामलं कर्णयुगं समं मृदुसमाहितं ॥ ५५ ॥**

**अर्थ**—ज्याचे दोन्ही कान बालचंद्राप्रमाणें असून केशरहित मोठे व उच्च दिसतील, तसेच निर्मल व कोमल असतील ते शुभ समजावेत ॥ ५५ ॥

**स्निग्धा नीलाश्च मृदवो मूर्धजाः कुंचितैकजा ॥**
**स्त्रीणां समं शिरः श्रेष्ठं पादपाणितले तथा ॥५६॥**

**अर्थ**—ज्याचे केंस स्निग्ध, कोमल, मृदु व नील

वर्णाचे असून कुरळे असतील तो सुख भोगील. त्यांत विशेषतः स्त्रियांचे केश तसे असणें श्रेष्ठ होय. त्याचप्रमाणें दोन्ही पाय, दोन्ही हात समान असतील तर ती स्त्री खचित सुख भोगील ॥ ५६ ॥.

## अथ हस्तपादनानाचिन्हदर्शनं.

**वाजिकुंजरश्रीवृक्षयज्ञेषु यवतोमरैः ॥**
**ध्वजचामरमालाभिः शैलकुंडलवेदिभिः ॥ ५७ ॥**

**अर्थ**—ज्याच्या हातावर ( पुरुषाच्या उजव्या व स्त्रीच्या डाव्या ) घोडा, हत्ती, कल्पवृक्ष, यज्ञकुंड, यज्ञस्तंभ, यव, तोमर, ध्वज, चामर, माला, पर्वत, कुंडल, यज्ञवेदि इत्यादि चिन्हें असतील, तो लक्ष्मीनारायणाच्या हस्ताप्रमाणें हस्त समजावा. तो पुरुष चक्रवर्ती राजा होईल. निदान एक दोन चिन्हें जरी भासमान होतील तर तो प्राणी सर्व ऐश्वर्य उपभोगील.

**शंखातपत्रपद्मैश्च मच्छस्वस्तिकसद्रथैः ॥**
**लक्षणैरंकुशाद्यैश्च स्त्रियः स्युः राजवल्लभाः ॥५८॥**

**अर्थ**—ज्याच्या हस्तावर अथवा चरणावर शंख, चक्र, कमल, मच्छ, मगरी, पताका, उत्तम रथ, आणि अंकुश, हीं चिन्हें दिसतील तो पुरुष असल्यास राजा व स्त्री असल्यास राणी होईल. ब्रह्मदेवानें हीं सर्व लक्षणें ज्ञानी पुरुषानें ओळखावीं म्हणूनच हस्तपादतलावर वठविलीं आहेत ॥ ५८ ॥

**निगूढमणिबंधौ च पद्मगर्भोपमौ करौ ॥**
**न निम्नं नोन्नतं स्त्रीणां भवेत्करतलं शुभं ॥ ५९ ॥**

**अर्थ**—ज्याचे हस्त किंवा चरण प्रशस्त असून मनगट मांसल व मोठें दिसेल, आणि तळहात कमलगर्भाप्रमाणें अति उंच नाहीं व अति नीच नाहीं असा असेल तो प्राणी भाग्यवान् होईल. स्त्रीविषयींही हींच लक्षणें जाणावीं ॥ ५९ ॥

**रेखान्वितात्यविधवां कुर्यात्संभोगिनीं स्त्रियं ॥**
**रेखायुग्मात्यंतलग्ना सुखभोगप्रदा शुभा ॥ ६० ॥**

**अर्थ**—ज्या स्त्रीच्या हातावर रेखायुग्म दिसेल ती महाभागा कधींही विधवा होणार नाहीं. आपल्या पतीसहवर्तमान नानाप्रकारचे विलास भोगून पूर्ण सुख अनुभवील हें रेखायुग्म अंगुष्ठ व तर्जनीमधून निघालेलें व जाड होत मणगटापर्यंत गेलें असलें पाहिजे ॥ ६० ॥

**रेखा या मणिबंधोत्था गता मध्यंगुलीकरे ॥**
**गता पाणितले या च योर्ध्वपादतले स्थिता ६१**

**अर्थ**—मणिबंधांतून उत्पन्न होऊन वर चढत मध्यंगुलीच्या मुळापर्यंत गेलेली रेषा तिला सामुद्रिक शास्त्रांत ऊर्ध्व रेषा ह्मणतात. ही ऊर्ध्व रेषा हातावर असल्यास उत्तमच, पण जरी तळपायावर असली तरी उत्तम मानिली आहे. ऊर्ध्वरेषा चिन्ह असणारा सर्वप्रकारें सुखी असतो ॥ ६१ ॥

**स्त्रीणां पुंसां तथा साम्यां राज्याय च सुखाय च॥**
**पुत्रपौत्रादिसंपन्ना चोर्ध्वरेखा सुखप्रदा ॥ ६२ ॥**

**अर्थ**—ज्या स्त्रियांच्या किंवा पुरुषांच्या हातांवर

ऊर्ध्व रेषा असल्यास तीं स्त्रीपुरुषें उत्तम सुख भोग-तील. आणि तळपायांवर असल्यास राज्यवैभव व स्त्रीसुख भोगील व पुत्रपौत्रादि संतति पाहील यांत संशय नाहीं ॥ ६२ ॥

**कनिष्ठा मूलरेखा तु कुर्याच्चैव शतायुषं ॥**
**अनामिकामध्यमाभ्यामंतरालग्नता सति ॥ ६३ ॥**

**अर्थ**—ज्याच्या हातावर कनिष्ठिकेच्या मूळांत एक बारीक व आंखूड रेखा असेल तो शतायु आहे असें निश्चयेंकरून समजावें. अशीच रेषा जर स्त्री-च्या अनामिका व मध्यमेच्या मध्यें वरून तुटून प-डल्या सारखी दिसेल तर ती महाभागा, महापतिव्र-ता व सुशील होईल. आणि अशीच रेखा जर पुरु-षाचे हातावर दिसेल तर तो पुरुष सत्यवादी, दयाळु, धर्मशील व जगन्मान्य होईल ॥६३॥

**ऊना ऊनायुषं कुर्यात् रेखा चांगुष्ठमूलगा ॥**
**बृहत्यः पुत्रास्तन्यस्ता प्रमदा परिकीर्तिताः ६४**

**अर्थ**—आंगठ्या खालच्या रेषांत जर लहान ल-हान पुष्कळ रेषा दिसतील तर तो प्राणी अल्पायु जाणावा. ज्याच्या अंगुष्ठमूळीं पूर्ण रेखा दिसतील तो पूर्णायु होईल. अंगुष्ठमूळांत जितक्या लांब व थोरथोर रेखा दिसतील तितक्या त्या सर्व पुत्र होण्याबद्दलच्या आहेत आणि लहान व बारीक बारीक ज्या रेखा दिसतील त्या कन्या होण्याचें लक्षण समजावें ॥६४॥

**अल्पायुषे लघुच्छिन्ना दीर्घच्छिन्ना महायुषे ॥**
**शुभं तु लक्षणं स्त्रीणां प्रोक्तं त्वशुभमन्यथा ६५**

**अर्थ**—रेखा परिज्ञानारंभीं पहाणारानें पहिल्यानें आंगठ्याच्या खालच्या रेषा पहाव्या. जर लहान व छिन्नभिन्न रेषा दिसल्या तर तो अल्पायु समजावा. त्याचप्रमाणें जर मोठ्या असून छिन्नभिन्न असतील तर कांहीं अधिक आयुष्य आहे असें समजावें ॥ ६५ ॥

## अथ अशुभ लक्षणं.

**कनिष्ठिकाऽनामिका वा यस्या न स्पृशते महीम्॥**
**अंगुष्ठं या गतातीत्य तर्जनी कुलटा च सा॥६६॥**

**अर्थ**—ज्या स्त्रीच्या चरणाची कनिष्ठिका व अनामिका चालतांना जमिनीस लागत नाहीं आणि तर्जनी आंगठ्यावर चढलेली असेल ती कुलटा स्वैरिणी, परपुरुष भोगणारी होईल ॥ ६६ ॥

**ऊर्ध्वद्वाभ्यां पिंडिकाभ्यां जंघे चातिशिरालके ॥**
**रोमशे चातिमांसे च कुंभाकारं तथोदरं ॥६७॥**

**अर्थ**—ज्या स्त्रीच्या मांड्या वरच्या बाजूस जाड असून त्यांवर नाडीच्या शिरा न दिसतां पुष्कळ केस दिसतील व त्या मांसल असतील तर ती कुलक्षणा स्त्री दुःखें भोगील. तसेंच स्त्रीचें उदर कुंभाप्रमाणें असणें हेंही अशुभ लक्षणच समजावें ॥ ६७ ॥

**पृथुलच्याप्रचंडाश्च स्त्रियः स्युर्नात्र संशयः ॥**
**केकरे पिंगले नेत्रे वेश्या लोलेक्षणा सती ॥६८॥**

**अर्थ**—ज्या स्त्रीचे गाल व गळा मोठा असेल ती दुष्ट वाक्यें उच्चारणारी निघेल. जिचे नेत्र पिंगळ्या वर्णाचे किंवा मांजरीच्या नेत्राप्रमाणें असतील ती

जारिणी होईल. तसेच जिचे नेत्र नत (खालीं पहाणारी) आणि चंचल असतील ती स्त्री व्यभिचारिणी व दुष्टोत्तरें बोलणारी व कुळाला डाग लावणारी होईल.

**सितें कूपे गंडयोश्च सा ध्रुवं व्यभिचारिणी ॥**
**प्रलंबिनी ललाटे च देवरं हंति चांगना ॥६९॥**

**अर्थ**—ज्या स्त्रीच्या गालावर काळसरपणा दिसेल ती व्यभिचारिणी होईल. त्याचप्रमाणें जिचें ललाट विस्तीर्ण असेल किंवा लांबट असेल ती आपल्या दिराचा घात करणारी होईल ॥६९॥

**उदरे श्वशुरं हंति पतिं हंति स्फिचोर्ध्वयोः ॥**
**या तु रोमोत्तरोष्ठी स्यान्न शुभा चोर्ध्वरेव हि७०**

**अर्थ**—ज्या स्त्रीचें पोट मोठें असून शाम वर्ण असेल ती स्त्री श्वशुराच्या नाशास प्रवर्तक होईल. ओंठ वर चढले असल्यास पतिघातकी समजावी. आणि ओंठांवर केंस (मिशा) असतील तर मातृवंश, पितृवंश व श्वशुर वंशाचा नाश करणारी होईल ७०

**स्तनौ सरोमावशुभौ कर्णौ च विषमौ तथा ॥**
**करालविषमा दंताः क्लेशाय च भयाय च ॥७१॥**

**अर्थ**—स्त्रीच्या स्तनांवर केंस असतील तर ते फारच अशुभ लक्षण समजावें. तसेंच कर्णद्वय लहान मोठे असतील तर किंवा दांत मोठे असून सारखे नसतील तर ते पुष्कळ त्रास व भय प्राप्त होण्याचें लक्षण होय. ॥ ७१ ॥

**चौर्याय पुष्टमांसाच्च दीर्घा भर्तुश्च मृत्यवे ॥**

**क्रव्यादरूपहस्तैश्च वृककंकादिसन्निभैः ॥ ७२ ॥**

**अर्थ**—ज्या स्त्रीच्या दांतांखालीं मांसाचे उंचवटे दृष्टिगोचर होतील ती चौर्य कर्मांत निपुण होईल. अथवा दात मोठे आणि विक्राळ असून शरीर लांबट असेल तर ती आपल्या पतीला मारील म्हणजे विधवा होईल. आणि कावळा, लांडगा किंवा गिधाड यांच्या हाताप्रमाणें हात असतील तर तीही विधवा होऊन क्लेश भोगील ॥ ७२ ॥

**शिरालैर्विषमैः शुष्कैर्वित्तहीना भवंतिहि ॥**
**दुःखिता पापनिरता ऊर्ध्वनाडी च डाकिनी ७३**

**अर्थ**—ज्या स्त्रीच्या प्रत्येक अवयवावर मोठमोठ्या शिरा स्पष्ट दिसतील, ती धनहीन, दरिद्रि, पातकी दुःखी, कलही, व्यभिचारिणी अशी खचित होईल.

**समुन्नतोत्तरोष्ठी या कलही रुक्षकेशिनी ॥**
**स्त्रीषु दोषा विरूपाक्षः यत्राकारो गुणस्तथा ७४**

**अर्थ**—ज्या स्त्रीचा वरचा ओंठ जाड व उंच असेल व केंस रुक्ष असतील ती कलही होण्याचें लक्षण आहे. त्याचप्रमाणें जिचे नेत्र भयंकर भासतील तीही भांडखोर व दुःखी होईल ॥ ७४ ॥

## अथ मिश्रलक्षणं.

**कनिष्ठांगुलिसमाश्रित्य मध्यमायामुपागता ॥**
**षष्टिवर्षायुषं कुर्यादायुरेखा तु मानवम् ॥ ७५ ॥**

**अर्थ**—कनिष्ठांगुलीच्या खालून निघून चाललेली जी मोठी रेषा, ती आयुष्यरेषा होय. ती जर मध्य-

मांगुलीच्या मुळापर्यंत गेलेली दिसेल, तर तें मनुष्य ६० वर्षें वांचेल यांत संशय नाहीं ॥ ७५ ॥

**यस्यास्ते कुंचिताः केशाः मुखं च परिमंडलं ॥**
**नाभिश्च दक्षिणावर्ता सा कन्या कुलवर्धिनी ७६**

**अर्थ**—ज्या कन्येचे केंस कुंचित ( कुरळ ) असून मुखावर येत असतील आणि जिची नाभि दक्षिणावर्ता असेल, ती कन्या सुलक्षणा व कुलवर्धिनी सुखी होईल असें समजावें ॥ ७६ ॥

**या च कांचनवर्णाभा रक्तहस्तकरोरुहा ॥**
**सहस्रेष्वपि नारीणां भवेत्सा च पतिव्रता ॥७७॥**

**अर्थ**—ज्या कन्येच्या शरीराचा वर्ण कांचनाप्रमाणें ( सोन्यासारखा ) असेल, आणि हस्त व पादतलांत अरुणाप्रमाणें वर्ण भासमान होईल, ती हजारांत एक पतिव्रता निपजेल. तिच्यापासून पुत्रपौत्रादि संततीची वृद्धि होईल. आणि ती आपल्या पतिसह सुख भोगील ॥ ७७ ॥

**रक्तकेशा च या कन्या मंडलाक्षी जया भवेत् ॥**
**भर्तारो म्रियते तस्याः नियतं दुःखभागिनी ७८**

**अर्थ**—ज्या स्त्रीचे केस रक्तवर्णाचे व नेत्र मंडलाकार असून मांजरीच्या नेत्रांप्रमाणें दिसतील, तिचा पति मरण पावेल आणि ती विधवा होऊन मरेपर्यंत नाना प्रकारचीं दुःखें भोगील ॥ ७८ ॥

**पूर्णचंद्रमुखी कन्या बालसूर्यसमप्रभा ॥**
**विशालनेत्रा बिंबोष्ठी सा कन्या लभते सुखम् ७९**

**अर्थ**—ज्या कन्येचें मुख पूर्णचंद्राप्रमाणें व प्रातःकालच्या सूर्याप्रमाणें जिची प्रभा आणि शरीर सुंदर असेल, नेत्र विशाल व ओष्ठ आरक्त (पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें) असतील ती कन्या पूर्ण सुखोपभोग करणारी राजस्त्री निपजेल आणि सर्व प्रकारच्या वैभवांची प्रचिती घेईल ॥ ७९ ॥

**रेखाभिर्बहुभिः क्लेशं स्वल्पभिर्धनहीनता ॥**
**रक्ताभिः सुखमाप्नोति कृष्णाभिः क्लेशतां व्रजेत्८०**

**अर्थ**—ज्या मनुष्याच्या हातावर लहान लहान पुष्कळ रेषा असतील, तें मनुष्य क्लेश भोगील. जर फार थोड्याच रेषा असतील, तें धनहीन होईल. ज्याच्या हस्तरेषा आरक्त (लाल) दिसतील, त्याला सुख होईल. त्याचप्रमाणें जर कृष्ण वर्णाच्या रेषा दिसतील तर त्याला क्लेश होतील ॥ ८० ॥

**अंकुशं कुंडलं चक्रं यस्याः पाणितले भवेत् ॥**
**पुत्रं प्रसूयते नारी नरेंद्रं लभते पतिम् ॥ ८१ ॥**

**अर्थ**—ज्या कन्येच्या हातावर अंकुश, कुंडल, चक्र चिन्ह असेल, ती राजस्त्री व पुत्रवतीं होऊन पूर्ण वैभवासह सुखानुभव घेईल ॥ ८१ ॥

**यस्यास्तु रोमशौ पार्श्वौ रोमयुक्तौ पयोधरौ ॥**
**उन्नतौ चाधरोष्ठौ च क्षिप्रं मारयते पतिम् ॥८२॥**

**अर्थ**—जिच्या दोन्ही कक्षांत बहुत केश असतील, स्तन केशयुक्त असतील आणि अधरोष्ठ दळदार असून वर चढलेले दिसतील ती आपल्या पतीस मारून वैधव्य दुःख भोगील ॥ ८२ ॥

यस्याः पाणितले रेखा प्राकारं दृश्यते यदि ॥
अपि दासकुले जाता राज्ञीत्वमुपगच्छति॥८३॥

**अर्थ**—जिच्या हातावर प्राकार ( दुमजली वाडा ) चिन्ह दृष्टीस पडेल, ती कन्या जरी दासीच्या पोटीं उपजली असली तरी राजस्त्री होऊन सुख भोगील ॥ ८३ ॥

ऊर्ध्वतः कपिला यस्या रोमराजी निरंतरम् ॥
अपि राजकुले जाता दासीत्वमुपगच्छति ॥८४॥

**अर्थ**—ज्या स्त्रीचे केशाग्र कपिलवर्ण किंवा पिंवळ्या वर्णाचे दिसतील, अथवा संपूर्ण केशाग्र भाग पीत वर्णाचा दिसेल, ती जरी राजकुलांत जन्मली तरी दासी होईल असें निश्चयानें समजावें. ॥ ८४ ॥

यस्या अनामिकांगुष्ठौ पृथिव्यां नैव तिष्ठतः ॥
पतिं मारयते क्षिप्रं स्वेच्छाचारेण वर्तते ॥ ८५ ॥

**अर्थ**—ज्या स्त्रीच्या पायाचा अंगठा व अनामिका भूमीला लागत नसेल, ती आपल्या पतीला मारून विधवा होईल, व स्वतंत्रपणानें वागेल आणि मरेपर्यंत क्लेश भोगील ॥ ८५ ॥

यस्यागमनमात्रेण भूमिकंपोपजायते ॥
पतिं मारयते क्षिप्रं स्वेच्छाचारेण वर्तते ॥८६ ॥

**अर्थ**—ज्या स्त्रीच्या चालण्यानें मोठा शब्द होईल व भूमि कांपते असें वाटेल, ती स्त्री आपल्या पतीस मारून विधवा होईल व स्वतंत्र वागून मरेपर्यंत क्लेश व दुःख भोगील ॥ ८६ ॥

**चक्षुस्नेहेन सौभाग्यं दंतस्नेहेन भोजनं ॥**
**त्वक्स्नेहेन च पर्यंकं पदस्नेहेन वाहनं ॥ ८७ ॥**

**अर्थ**—ज्याचे नेत्र सुरेख व शोभायमान दिसतील, तें मनुष्य भाग्यवान् निपजेल. ज्याचे दंत सुरेख असतील, त्याला नित्य षड्रसान्न भोजन मिळेल. ज्याच्या शरीराची त्वचा सुरेख व स्निग्ध असेल, त्याला नित्य उत्तम शय्यासुख मिळेल, ज्याचे चरण ( पद ) सुंदर असतील त्याला उत्तम वहानें मिळतील असें जाणावें ॥ ८७ ॥

**स्निग्धोन्नतौ ताम्रनखौ नार्याश्च चरणौ शुभौ ॥**
**मत्स्यांकुशाब्जचिन्हौ च चक्रलांगललक्षितौ ८८**

**अर्थ**—स्त्रीचे चरण मोठे व कोमल आणि नखें उंच व ताम्र वर्णाची असल्यास तें उत्तम लक्षण होय. चरणतलावर जर मच्छ, अंकुश, कमल चक्र आणि नांगर हीं चिन्हें असतील, तर ती स्त्री महाभाग्यवती व सुख भोगणारी निपजेल. पूर्व कथित चिन्हांतून एक चिन्ह जरी असलें तरी सुखदाय असें समजावें.

**अस्वेदिनौ मृदुतलौ प्रशस्तौ चरणौ स्त्रियाम् ॥**
**शुभौ जंघे विभेषे च ऊरू हस्तिकरोपमौ ॥८९॥**

**अर्थ**—स्त्रीचे चरणद्वय स्वेदरहित, प्रशस्त व कोमल असल्यास तें शुभ लक्षण होय. रोमरहित व गजशुंडेप्रमाणें जंघा असल्यास तें उत्तम फल देणारें लक्षण जाणावें. वरील शुभलक्षणांनीं युक्त स्त्री संपूर्ण सुखानुभव घेईल ॥ ८९ ॥

**नाभिः प्रशस्ता गंभीरा दक्षिणावर्तका शुभा ॥**

**अरोमत्रिवली नार्याः हृत्स्तनौ रोमवर्जितौ ९०**

**अर्थ**—ज्या स्त्रीची नाभि श्रेष्ठ, गंभीर व खोल असून दक्षिणावर्त दिसेल, ती स्त्री सुख भोगील. नाभीवर रोमरहित त्रिवली असणें श्रेष्ठ फल कथन करीत आहे. पयोधर (रोमरहित) दिसल्यास तेंही सुलक्षण आहे. वरील सर्व सुलक्षणांनीं युक्त स्त्री भाग्यवती व पुत्रवती होऊन निश्चयानें सुख भोगील ॥ ९० ॥

**श्लिष्टांगुलीताम्रनखौ पादावुच्चौ शिरांचितौ ॥**
**कूर्मोन्नतौ गूढगुल्फौ स्वपार्ष्णी नृपतेः स्मृतौ॥९१॥**

**अर्थ**—ज्याच्या चरणांगुली मिळालेल्या असून त्यांचीं नखें ताम्र वर्णाचीं असतील; तसेंच पाय उंच असून त्यांवर शिरा स्पष्ट प्रतीत होतील. त्याचप्रमाणें कूर्मपृष्ठाप्रमाणें दळदार चरण दिसतील व गुल्फही मांसल व वाटोळे असतील तो राजैश्वर्यानें युक्त असें पूर्ण सुख अनुभवील असें जाणावें ॥ ९१ ॥

**शूर्पाकारौ विरूक्षौ च वक्रौ च विरलांगुली ॥**
**कषायसदृशौ पादौ दारिद्राणां प्रकीर्तितं ॥९२॥**

**अर्थ**—ज्याचे चरण शूर्पाकार ( सुपासारखे ) दिसण्यांत विरूप, रूक्ष, तिरकस व अंगुली विरळ असून पायांचा रंग तांबड्या मातीसारखा असेल, तो मरेपर्यंत दरिद्र दुःखानें व्यापलेला असेल ॥ ९२ ॥

**इदं सामुद्रिकं शास्त्रं विष्णुना परिभाषितं ॥**
**श्रुत्वा धृत्वा पठित्वा च शोकान् जहति पंडितः९३**

**अर्थ**—महादेव पार्वतीस म्हणतात—हें श्री वि-

ण्णूनें सांगितलेलें सामुद्रिकशास्त्र, जो श्रवण व पठन करील, किंवा कोणास पढवील, अथवा स्वतः मनन करील त्याच्या सर्व चिंता व शोक दूर होऊन तो विख्यात पंडित होईल ॥ ९३ ॥

**इति श्रीहरगौरीसंवादे सामुद्रिकलक्षणं संपूर्णम् ॥**

## अथ वराहमिहिरकृतसामुद्रिकारंभः

### श्लोक

अस्वेदनौ मृदुतलौ कमलोदराभौ
श्लिष्टांगुली रुचिरताम्रनखौ सुपार्ष्णी ॥
उष्णौ शिराविरहितौ सुनिगूढगुल्फौ
कूर्मोन्नतौ च चरणौ मनुजेश्वरस्य ॥ १ ॥

**अर्थ**—राजाचे पाय घर्मरहित, मऊ तळवे, व कमलाच्या गाभ्याप्रमाणें कांति असते. एकमेकांस जुळलेलीं बोटें, सुंदर ताम्रवर्ण नखें, पार्ष्णिभाग चांगले, उष्ण, आणि शिरारहित, अतिसूक्ष्म घोटे, पुढचा भाग कूर्मपृष्ठाप्रमाणें उंच. इत्यादि लक्षणांनीं युक्त असतात ॥ १ ॥

प्रविरलतनुरोमवृत्तजंघा
द्विरदकरप्रतिमैर्वरोरुभिश्च ॥
उपचितसमजानवश्च भूपा

धनरहिताः श्वमृगालतुल्यजंघाः ॥ २॥

**अर्थ**—अंगावरचे केंस विरळ विरळ, वाटोळी जंघा, हत्तीच्या सोंडेसारख्या मांड्या, सारख्या आणीदार पिंडऱ्या, हीं राज चिन्हें होत. कोल्हीं, कुत्रीं, ह्यांच्यासारख्या जंघा असणारे दरिद्रि जाणावे ॥२॥

रोमैकैकं कूपके पार्थिवानां
द्वे द्वे ज्ञेये पंडितश्रोत्रियाणां ॥
त्र्याद्यैर्निस्वा मानवा दुःखभाजः
केशाश्चैवं निंदिताः पूजिताश्च ॥ ३ ॥

**अर्थ**—एकेका रोमकूपांत एकेक केंस याप्रमाणें असेल तर महाराजा होईल. दोन असतील तर पंडित किंवा श्रोत्रिय होईल. तीन तीन असतील तर केवळ दुःख भोगणारा मनुष्य होईल. यापुढें ६ पर्यंत केंस असतात त्यांचीं क्लेश, सुख इत्यादि लक्षणें जाणावीं ३

निर्मांसजानुर्म्रियते प्रवासे
सौभाग्यमल्पैर्विकटैर्दरिद्रः ॥
स्त्रीनिर्जिताश्चापि भवंति निम्नै
राज्यं समांसैश्च महद्भिरायुः ॥ ४ ॥

**अर्थ**—मांसरहित पायाच्या पिंडऱ्या असणारा परदेशीं प्रवासीं मरण पावेल. त्याच जर गोंडस असतील तर भाग्यलक्षण समजावें. त्याच फार मोठ्या आणि वक्र असल्यास दरिद्रि, व लोंबण्या जेग्या असल्यास स्त्रीपासून पराभव पावेल. त्याच घट्ट आणि मांसानें पुष्ट असल्यास राज्यार्ह भोग, व आयुष्मान् होईल ॥ ४ ॥

**द्वित्रिचतुर्धाराभिः प्रदक्षिणावर्तवलिमूत्राभिः ॥**
**पृथ्वीपतयो ज्ञेया विकीर्णमूत्राश्च धनविहीनाः ५**

**अर्थ**—लघवी करते वेळेस दोन तीन चार धारा उजव्या फेरानें पडत असतील तर भूमिपालक जाणावा. तुटक तुटक आणि अखेर विस्तृत अशी ज्याची लघवी होत असेल तो दरिद्री जाणावा ॥ ५ ॥

**एकैव मूत्रधारा वलिता रूपप्रधानसुतदात्री ॥**
**स्निग्धोन्नतसममणयो धनवनितारत्नभोक्तारः॥६॥**

**अर्थ**—एकच धारेनें लघवी होत असली तर त्यास सुरूप पुत्र होईल. स्निग्ध ( बुळबुळीत ) लघवी असून उंच व निराळे मण्यासारखे बिंदु असल्यास धन, स्त्री, रत्नें यांचा भोक्ता होईल ॥ ६ ॥

**सिंहकटिर्मनुजेंद्रः कपिकरभकटिर्धनैः परित्यक्तः॥**
**समजठरा भोगयुता घटपिठरनिभोदरा निःस्वाः७**

**अर्थ**—सिंहकटी असल्यास राजा होईल. मर्कट गर्दभ यांच्यासारखी कंबर असल्यास धनहीन होईल. पोट सारखे असल्यास भोगशाली होईल डेरक्यासारखें असल्यास दरिद्री होईल ॥ ७ ॥

**कंबुग्रीवो राजा प्रलंबकंठः प्रभक्षणो भवति ॥**
**पृष्ठमभग्नमरोमशमर्थवतामशुभदमतोन्यत् ॥ ८ ॥**

**अर्थ**—शंखासारखी मान असल्यास राजा, लांबट मान असल्यास खादाड याप्रमाणें होईल. पाठ विस्खलित, व रोमरहित असली तर धनवान् होईल. पाठीवर केंसांचे पुंजके पुंजके असल्यास अशुभ जाणावें.

हस्तांगुलयो दीर्घाश्चिरायुषामवलिताश्च सुभगानां
मेधाविनां च सूक्ष्माश्चिपिटाः परकर्मनिरतानां ९

अर्थ—हातांचीं बोटें लांब असल्यास दीर्घायु होईल. सुरकुत्या नसल्यास सौभाग्यप्राप्ति होईल. सूक्ष्म असल्यास बुद्धिमान् होईल. पोह्यासारखी मध्यें फुगीर असल्यास परकर्मनिरत होईल ॥ ९ ॥

इति वराहमिहिरकृतसामुद्रिकं समाप्तम्.

---

## अथ गर्गमुनिकृतसामुद्रिकारंभः

अथातः संप्रवक्ष्यामि गर्गसामुद्रसंग्रहं ॥
स्त्रीणां च पुरुषाणां च फलसाम्याय कल्पते ॥१॥

अर्थ—आतां गर्गमुनिकृत सामुद्रिक सांगतों. त्याचें फल स्त्री व पुरुष यांना सारखें जाणावें ॥ १ ॥

अंगुष्ठमूलगा रेखाः संतानं सूचयंति ताः ॥
सांकुरांश्च तथा नार्यः पुरुषाः सजटाः स्मृताः॥२॥
गर्भस्रावोतिसूक्ष्मत्वे विच्छेदे बालघातनं ॥
दीर्घा दीर्घायुषो ज्ञेया अल्पा अल्पायुषः स्मृताः३
तदभावे प्रजाभाव इति संतानलक्षणं ॥
दंपत्यन्यतराभावे तदभावोन्यथान्यथा ॥ ४ ॥

अर्थ—अंगठ्याच्या खालीं वरच्या बाजूस असणाऱ्या रेखा संतानसूचक होतात. त्या अंकुरयुक्त अस-

ल्यास स्त्रीप्रजा, व रेषेस फांटे फुटले असल्यास पुरुषप्रजा जाणवितात. लांब असल्यास दीर्घायु, अल्प असल्यास अल्पायु, सूक्ष्म असल्यास गर्भस्राव, विच्छिन्न असल्यास बालमरण, याप्रमाणें समजावें. त्यारेषांचा अभाव असल्यास संतति होणार नाहीं. याप्रमाणें संतानलक्षण जाणावें. पुरुषाच्या हातांत रेषा असून स्त्रीस नसतील तर पुरुषास अन्य स्त्रीपासून संतति होईल. व स्त्रीच्या हातावर रेखा असून पुरुषास नसतील तर स्त्रीस अन्य पुरुषापासून संतति होईल. दोघांसही रेषा नसतील तर संतानच नाहीं. किती रेषा असतील तितकें संतान सांगावें. विधवेस रेखा असतील तर पूर्वसंतति नसल्यास गोळक संतति जाणावी.

**कनिष्ठांगुलिमूले तु रेखाः करतलांतगाः ॥**
**सहोदरं सूचयंति पुत्रवत्तत्रानिर्णयः ॥ ५ ॥**

**अर्थ**—कनिष्ठिकेच्या खालीं तळहाताच्या शेवटीं असणाऱ्या रेषा भावंडें, बहिणी सुचवितात. संतान निर्णयाप्रमाणेंच ह्यांचेंही लक्षण समजावें ॥ ५ ॥

**मध्ये तु धनरेखाया दक्षिणोत्तरपार्श्वके ॥**
**मातरं पितरं विद्याद्वर्गरेखाः समीपगाः ॥ ६ ॥**
**संसक्ता आत्मरेखायामात्मबांधवसूचकाः ॥**
**सूक्ष्मत्वेपि च रेखानां फलं संतानवन्मतं ॥ ७ ॥**

**अर्थ**—तळहाताच्या मध्यें धनरेखेच्या उजव्या बाजूस मातृरेखा, व मातामह, मातुळ, मातृभगिनी इत्यादिकांच्या रेषा असतात. उत्तरेस पितृज्ञाति रेषा

असतात. मातृरेखेखालीं आत्मरेखा मिळाल्या असतात, त्या आत्मबंधूच्या रेखा ह्या सर्व सूक्ष्म असल्या तरी आकारफल संतान रेखेला सांगितल्याप्रमाणें समजून निर्धार करावा ॥ ७ ॥

पादादि कटिपर्यंतं ततः कंठांतमेव च ॥
ततः केशांतमृक्षाणां विज्ञेयं नवकत्रयं ॥ ८ ॥

**अर्थ**--पायापासून नाभिपर्यंत नऊ भाग, तेथून कंठापर्यंत नऊ भाग, तेथून मस्तकावरील केंसापर्यंत नऊ भाग याप्रमाणें २७ नक्षत्रें सत्तावीस भागांचीं समजावीं ॥ ८ ॥

वर्तुलं चतुरस्रं च त्रिकोणं बाणमेवच ॥
दीर्घं यच्चतुरस्राख्यं पंचकोणं धनुस्तथा ॥ ९ ॥
ध्वजश्चेति ग्रहस्तारा यस्मिन्नंगे प्रदृश्यते ॥
तद्राशौ तद्ग्रहे जन्म तद्दशायां तु तद्भवेत् ॥१०॥
ग्रहनक्षत्रविज्ञानात्सर्वं ज्यौतिषकं वदेत् ॥
आयुर्धनविवाहादि रेखाभिः फलयोजनं ॥११॥

**अर्थ**—सूर्यादिग्रहांच्या मंडलाकार रेखा ज्या अंगाचेठायीं असतात तोच ग्रह तदंगराशींत असले वेळीं त्याचा जन्म झालेला असतो. ज्या अंगाचेठायीं जी मंडलरेखा दिसते तेव्हां ती दशा चालत असते. ग्रहनक्षत्रांच्या ज्ञानेंकरून ज्योतिषशास्त्राप्रमाणें सर्व फळें सांगतां येतील. आयुर्धनविवाहादिरेखाफल त्याचप्रमाणें जाणावें ॥ ११ ॥

**अंगागुलं शिरोनिघ्नं तष्टं द्वादशभिस्तथा ॥**
**लग्नं विज्ञायते तेन सर्वं फलमुदीरयेत् ॥ १२ ॥**

**अर्थ**—देहाच्या लांबीच्या अंगुलसंख्येस मस्तकाच्या सभोंवार घेराच्या अंगुलसंख्येनें गुणून त्यास बारांनीं भागावें. ह्मणजे बाकी जी उरेल तीच मेषादिराशि होऊन त्यापासून लग्ननिर्णय होतो. त्यावरून सर्व फल सांगावें.

इति गर्गमुनिकृतम् सामुद्रिकं समाप्तम्.

**समाप्त.**